**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100

© Dada Bhagwan Foundation,
5, Mamta Park Society, B\h. Navgujarat College,
Usmanpura, Ahmedabad - 380014, Gujarat, India.
**Email :** info@dadabhagwan.org
**Tel :** + 91 79 3500 2100

**All Rights Reserved. No part of this publication may be shared, copied, translated or reproduced in any form (including electronic storage or audio recording) without written permission from the holder of the copyright. This publication is licensed for your personal use only.**

**प्रथम आवृत्ति** : 3000, ऑक्टोबर, 2016

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 10 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रोनीक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN** : 978-93-86321-01-5

Printed in India

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





# दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवत आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञानासंबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषयांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये असे विशेष ध्यान ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रुटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानार्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.

❖❖❖❖❖

# संपादकीय

पुण्य प्राप्त करण्याचे अनेक मार्ग शास्त्रकारांनी आणि धर्मगुरूंनी दाखविले आहेत. त्यातील एक आहे दान. दान म्हणजे दुसऱ्याला आपले काही तरी देऊन त्याला सुख देणे.

दान देण्याची प्रथा मनुष्याच्या जीवनात लहानपणापासूनच अंगिकारण्यात आली आहे. घरात लहान मूल असेल त्यालाही देवळात घेऊन जातात तेव्हा देवळाबाहेर बसलेल्या गरीब लोकांना मुलांच्या हस्ते पैसे वाटतात, खायला देतात आणि मंदिराच्या दानपेटीत पैसे टाकायला देतात. अशा प्रकारे लहानपणापासूनच दान देण्याचे संस्कार मिळत राहतात.

दान देताना आतील अजागृती असेल तर दान देऊनही कशा प्रकारे खोट खाल्ली जाते त्याचे सूक्ष्म निरुपण परम पूज्य दादाश्रींनी केले आहे. दान देताना कोणती जागृती ठेवावी ? सर्वात उच्च प्रकारचे दान कोणते ? दान कोणकोणत्या प्रकारे होऊ शकते ? दानाचे प्रकार कोणकोणते ? त्यामागील भावना कशी असावी ? दान कोणाला द्यावे ? वगैरे, वगैरे. दानासंबंधीत अनेक गोष्टी, ज्या दादाश्रींच्या ज्ञानवाणी द्वारे निघालेल्या आहेत, त्या प्रस्तुत पुस्तकात संकलित करून प्रकाशित करण्यात आले आहे. जे सुज्ञ वाचकास दान देण्यासाठी उत्तम मार्गदर्शिका म्हणून उपयोगात येईल.

**– डॉ. नीरूबहन अमीन**

# दान

## दान कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** दान कशासाठी दिले जाते?

**दादाश्री :** असे आहे की दान देऊन तो स्वत: काही मिळवू इच्छितो. सुख देऊन सुख प्राप्त करू इच्छितो. मोक्षासाठी दान देत नाही. लोकांना तुम्ही सुख दिले तर तुम्हाला सुख मिळेल. जे तुम्ही देता ते तुम्ही मिळवता. म्हणजे हा तर नियम आहे, दिल्याने आपल्याला मिळते, प्राप्त होते, आणि घेतल्याने ते निघून जाते.

**प्रश्नकर्ता :** उपवास करणे चांगले की काही दान करणे चांगले?

**दादाश्री :** दान देणे म्हणजे शेतात पेरणे. शेतात पेरले म्हणजे मग त्याचे फळ मिळेल. आणि उपवास केल्याने आतील जागृती वाढेल. परंतु शक्तिनुसार उपवास करायला देवाने सांगितले आहे.

## दान म्हणजेच सुख देणे

दान म्हणजे दुसऱ्या कोणत्याही जीवाला, मग तो मनुष्य असो किंवा प्राणी असो, त्यांना सुख देणे, याचे नाव दान. आणि सर्वांना सुख दिले तर त्याच्या 'रिॲक्शन' ने आपल्याला सुखच मिळते. सुख दिले तर लगेचच तुम्हाला घरबसल्या सुख मिळेल. तुम्ही दान देता, तेव्हा तुम्हाला आतून सुख वाटते. स्वत:च्या घरचे पैसे काढून देता तरी सुख वाटते. कारण चांगले काम केले. चांगले काम केले म्हणजे सुख वाटते आणि वाईट काम केले म्हणजे दु:ख वाटते. या वरून आपल्याला कळते की कोणते काम चांगले व कोणते वाईट!

## आनंद प्राप्तीचे उपाय

**प्रश्नकर्ता :** मानसिक शांती मिळवण्यासाठी माणसाने एखाद्या गरीबाची, एखाद्या अशक्त माणसाची सेवा करावी, देवाची भक्ती करावी की मग कोणाला दान द्यावे? काय करायला हवे?

**दादाश्री :** मानसिक शांती हवी असेल तर आपली वस्तू दुसऱ्यास खाऊ घालावी. उद्या आईस्क्रीमचे पिंप भरून आण आणि या सर्वांना खायला घाल. मग त्यावेळी तुला किती आनंद होतो, ते तू मला सांग. ह्या लोकांना आईस्क्रीम खायचे नाही, पण तू तुझ्या शांतीचा प्रयोग करून बघ. या थंडीत कोणी रिकामा नाही आईस्क्रीम खायला. या प्रमाणे तू जिथेही असशील तिथे जी जनावरे असतात, ही माकडे असतात, त्यांना चणे दिले तर ती खुश होऊन उड्या मारतात. तेव्हा तुझ्या आनंदाला सीमा राहत नाही. ते खात राहतील आणि तुझ्या आनंदाला सीमा राहणार नाही. या कबुतरांना तू दाणे टाकण्याअगोदरच ती खुश होऊन उड्या मारू लागतात. आणि तू टाकलेस, तुझी वस्तू दुसऱ्यास दिलीस की आतून आनंद वाटू लागतो. आता एखादा मनुष्य जर रस्त्यात पडला आणि त्याचा पाय मोडला आणि रक्त वाहत असेल, तेव्हा तू स्वतःचे धोतर फाडून तिथे बांधतोस त्यावेळी तुला आनंद वाटतो. ते धोतर जरी शंभर रुपयाचे असले, तरी ते फाडून तू बांधतो. पण त्यावेळी तुला खूप आनंद होतो.

## दान कुठे द्यावे?

**प्रश्नकर्ता :** काही धर्मात असे सांगितले जाते की जे काही तुम्ही कमावता, त्यातून काही टक्के दान करा, पाच-दहा टक्के दान करा, तर ते कसे आहे?

**दादाश्री :** धर्मामध्ये दान करण्यास हरकत नाही, पण ज्या धार्मिक संस्थांमध्ये लक्ष्मीचा धर्मासाठी सदुपयोग होत असेल तिथे द्या. जेथे दुरुपयोग होत असेल तिथे देऊ नका, दुसरीकडे द्या.

पैसे सदुपयोगासाठी वापरले जातील याकडे विशेष काळजी घ्या. नाही तर तुमच्याजवळ जर जास्त पैसे असतील तर ते तुम्हाला अधोगतीत घेऊन जातील. म्हणून त्या पैशांचा कुठेही सदुपयोग करा. धर्माचार्यांनी मात्र पैसे घेऊ नये.

## वळवा लक्ष्मी, धर्माकडे

पैसे सांभाळणे हे तर खूपच कठीण आहे, त्यापेक्षा तर कमी कमावलेले चांगले. इथे वर्षभरात दहा हजार कमावले आणि एक हजार देवाजवळ ठेवले तर काही अडचण नाही. कोणी लाखो दिले आणि कोणी हजार दिले, दोन्ही समान आहे, पण निदान हजार तरी दिले पाहिजेत. माझे काय म्हणणे आहे की काहीच द्यायचे नाही, असे करू नका, कमी असेल तरी त्यातले काही तरी द्या आणि जर जास्त असतील आणि ते पैसे धर्माकडे वळवले, तर मग आपली जबाबदारी राहत नाही. अन्यथा जोखीम आहे. ती तर खूप उपाधी आहे. पैसे सांभाळणे म्हणजे फार कठीण आहे. गाई-म्हशींना सांभाळणे बरे, त्यांना खुंटीला बांधले तर सकाळपर्यंत कुठे जाणार तर नाहीत. परंतु पैसे सांभाळणे हे फार कठीण आहे. कठीण, उपाधी आहे सगळी...

## लक्ष्मी टिकत का नाही?

**प्रश्नकर्ता :** मी दहा हजार रुपये महिना कमावतो, पण माझ्याकडे लक्ष्मीजी (पैसे) टिकत का नाही?

**दादाश्री :** सन 1942 च्या नंतरची लक्ष्मी टिकत नाही. ती जी लक्ष्मी आहे ती पापाची लक्ष्मी आहे, म्हणून टिकत नाही. आता पुढच्या दोन-पाच वर्षांनंतरची लक्ष्मी टिकेल. आम्ही ज्ञानी आहोत, तरी पण लक्ष्मी येते, पण टिकत नाही. इथे इन्कमटॅक्स भरता येईल इतकी लक्ष्मी आली तरी खूप झाले!

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मी टिकत नाही, तर काय करावे?

**दादाश्री :** लक्ष्मी तर टिकेल अशी नसतेच, पण तिचा मार्ग बदलून टाकला पाहिजे. ती ज्या मार्गाने जात असेल त्याचा प्रवाह बदलून टाकावा आणि धर्माच्या मार्गावर वळवावी. ती जेवढी सुमार्गावर जाईल तेवढी खरी. भगवंत येतील तेव्हाच लक्ष्मी टिकेल, त्याशिवाय लक्ष्मी टिकणारच कशी? भगवंत असतील तिथे क्लेश होत नाहीत आणि फक्त लक्ष्मीजी असेल तर क्लेश आणि भांडणे होतात. लोक लक्ष्मी भरपूर कमावतात, पण ती वाया जाते. एखाद्या पुण्यशाली माणसाच्या हातून लक्ष्मी चांगल्या मार्गाने वापरली जाते. लक्ष्मी चांगल्या मार्गाने वापरली जाते, हे एक मोठे पुण्य म्हटले जाते.

सन 1942 नंतरच्या लक्ष्मीमध्ये काही सारच नाही. हल्ली लक्ष्मी योग्य ठिकाणी वापरली जात नाही. योग्य जागी खर्च झाली, तर फारच चांगले म्हटले जाईल.

## सात पिढ्यांपर्यंत टिकते लक्ष्मी

**प्रश्नकर्ता :** जसे की भारतात कस्तूरभाई लालभाईची पिढी आहे, तर दोन-तीन-चार पिढ्यांपर्यंत पैसे चालत राहतात, त्यांच्या मुलांच्या मुलांपर्यंत. पण इथे अमेरिकेत कसे आहे की पिढी असते, पण फार तर सहा आठ वर्षात सर्व काही संपून जाते. एक तर पैसे असले तर जातात आणि नसले तर पैसे येतातसुद्धा. तर त्याचे कारण काय असेल?

**दादाश्री :** असे आहे ना, तेथील जे पुण्य आहे, इंडियाचे पुण्य, ते इतके चिकट असते की सारखे धूत राहिले, तरीही संपत नाही आणि पाप सुद्धा इतके चिकट असते की धूतच राहिले, तरी संपत नाही. म्हणजे तो वैष्णव असो की जैन असो, त्याने पुण्य इतके मजबूत बांधलेले असते की धूतच राहिले तरी संपत नाही. जसे की पेटलादचे दातार सेठ, रमणलाल शेठयांच्या सात-सात पिढ्यांपर्यंत संपन्नता टिकून राहिली. खोऱ्याने उपसून उपसून लोकांना धन देत असत, तरीही कधी कमी पडले नाही. त्यांनी पुण्य जबरदस्त बांधले होते, एकदम सचोटीने. आणि

काही जण पापही असेच सचोटीने बांधत असत, की सात-सात पिढ्यापर्यंत गरिबी जात नसे. अतिशय दुःख भोगत. म्हणजेच एक्सेस (अति) पण होत असे आणि मिडीयम (मध्यम) पण राहत असे.

इथे अमेरिकेत तर उतू पण जाते आणि परत बसतेही. एकदा बसल्यावर पुन्हा उतूही जाते. इथे वेळच लागत नाही. आणि तिथे भारतात एकदा बसल्यावर पुन्हा उतू जाण्यासाठी खूप वेळ लागतो. म्हणूनच तिथे तर सात-सात पिढ्यांपर्यंत चालत असे. आता सगळे पुण्य कमी झाले आहे. कारण काय होते, की कस्तूरभाईच्या येथे जन्म कोण घेणार? तर जे त्यांच्या सारखेच पुण्यवान असतील तेच तिथे जन्म घेतील. मग त्यांच्या घरी कोण जन्माला येतो? तर तसाच पुण्यशाली तिथे जन्माला येतो. यात कस्तूरभाईचे पुण्य काम करत नाही. ते मग तसाच कोणी दुसरा आला असेल त्याचे पुण्य. म्हणून तर ती म्हटली जाते कस्तूरभाईची पिढी, पण सध्या असे पुण्यशाली आहेतच कुठे? आता गेल्या पंचवीस वर्षात तर खास असे कोणी नाहीच.

## नाही तर गटारात वाहून जाईल...

पूर्वी तर लक्ष्मी पाच पिढ्यांपर्यंत तरी टिकायची, तीन पिढ्यांपर्यंत तरी टिकायची. आता तर लक्ष्मी एक पिढीसुद्धा टिकत नाही. या काळाची लक्ष्मी कशी आहे? तर एक पिढीसुद्धा टिकत नाही. त्यांच्या उपस्थितीतच येते आणि त्यांच्या उपस्थितीतच जाते, अशी ही लक्ष्मी आहे. ही तर पापानुबंधी पुण्याची लक्ष्मी आहे. त्यात जर थोडी फार पुण्यानुबंधी पुण्याची लक्ष्मी असेल, तर ती तुम्हाला येथे (सत्संगात) येण्यासाठी प्रेरणा देते. इथे तुमची आमच्याशी भेट घालून देते आणि इथे तुमच्याकडून खर्चही करवते. चांगल्या मार्गाने लक्ष्मी जावी, नाही तर सर्व धुळीत मिळून जाईल. सर्व गटारात वाहून जाईल... ही मुले आपलीच लक्ष्मी उपभोगतात ना. आणि आपण जर मुलांना म्हटले की तुम्ही आमची लक्ष्मी उपभोगत आहात, तर ते म्हणतील तुमची कशी? 'आम्ही तर आमचीच उपभोगत आहोत,' असे बोलतील. म्हणजे गटारीतच गेले ना सगळे!

## अतिरिक्त वाहू द्या, धर्मासाठी

हा तर लोकसंज्ञेमुळे दुसऱ्यांचे पाहून शिकतो. पण जर ज्ञानींना विचारले तर ते म्हणतील. नाही, हे का म्हणून असे खड्ड्यात पडतात? या दु:खाच्या खड्ड्यातून निघाला की परत पैशांच्या खड्ड्यात पडला! अतिरिक्त असेल तर इथेच धर्मकार्यात वापरून टाक. तेच तुझ्या हिशोबात जमा होतात. हे बँकेचे पैसे काही जमा होत नाहीत. आणि तुला कधी पैशाची अडचणही येणार नाही. जो धर्मासाठी देतो त्याला कधी अडचण येत नाही.

## त्याचा प्रवाह बदला

कसोटीच्या वेळी तर एक धर्मच फक्त आपल्या मदतीसाठी उभा राहतो, म्हणून धर्माच्या प्रवाहात लक्ष्मीजीला जाऊ द्यावे. फक्त एक सुषमकाळातच (जेव्हा तीर्थंकर भगवंत हजर असतात तो काळ) लक्ष्मी मोह करण्यायोग्य होती. त्या लक्ष्मीजी तर आल्या नाहीत, आणि आता या शेठ लोकांना हार्ट फेल आणि ब्लडप्रेशर कोण करवते? तर या काळाची लक्ष्मीच करवते.

पैशांचा स्वभाव कसा आहे? चंचल आहे. म्हणजे येतात व एक दिवस परत निघून जातात. म्हणून पैसे लोकांच्या हितासाठी वापरावेत. जेव्हा तुमचा वाईट कर्माचा उदय आला असेल, तेव्हा लोकांना जे दिले असेल तेच तुम्हाला मदत करील. म्हणून आधीच समजून घ्यावे. पैशांचा सदुपयोग तर केलाच पाहिजे ना?

चारित्र्याने समंजस झालात तर समजा, संपूर्ण जग जिंकले. मग भले जे खायचे असेल ते खाऊ दे, पिऊ दे आणि अधिक असेल तर इतरांना खाऊ घालू दे. याशिवाय दुसरे करण्यासारखे तरी काय आहे? सोबत घेऊन जाता येते का? जे धन परक्यांसाठी खर्च केले, तेवढेच धन आपले, तेवढीच तुमच्या पुढच्या जन्मासाठी जमापुंजी. म्हणून जर कोणाला पुढील जन्मासाठी जमा करायची असेल तर धन परक्यांसाठी

वापरावे. परका जीव, त्यात कुठलाही जीव, मग तो कावळा का असेना, तो इतकेसे जरी चाखून गेला तरीही ती तुमची जमा रक्कम. तुम्ही आणि तुमच्या मुलांनी खाल्ले ती काही तुमची जमा रक्कम नव्हे. ते सर्व गटारीत गेले. पण तरीही गटारीत जाणे थांबवू शकत नाही, कारण ते तर अनिवार्य आहे, गत्यंतरच नाही. पण त्याचबरोबर हे समजले पाहिजे की परक्यांसाठी खर्च केले नाही, ते सगळे गटारीतच जाते.

माणसाला जरी खाऊ घातले नाही पण शेवटी कावळ्याला घातले, चिमण्यांना घातले, या सर्वांना खाऊ घातले तरी देखील ते इतरांसाठी खर्च केलेले मानले जाईल. माणसाच्या ताटाची किंमत तर आता फार वाढली आहे ना? पण चिमण्यांच्या ताटाची किंमत तर खास नाही ना? तेव्हा तुमची जमा पण तेवढी कमीच होईल ना?

## मनोभाव बिघडले आहे म्हणून...

**प्रश्नकर्ता :** काही काळापर्यंत मी माझ्या कमाईतून तीस टक्के धार्मिक कार्यासाठी देत होतो, पण आता ते सगळे थांबले आहे. पूर्वी जे काही देत होतो, ते आता देऊ शकत नाही.

**दादाश्री :** तुम्हाला द्यायचे असेल तर ते दोन वर्षानंतरही देता येईलच! तिथे काही तोटा नाही. तिथे तर भरपूर आहे. तुमचे मनोभाव बिघडले असतील तर मग काय होणार

## आल्यानंतर देऊ की दिल्यानंतर येतील?

मी एका माणसाच्या बंगल्यात बसलो होतो, तेव्हा तिथे चक्रीवादळ आले. म्हणून दारे खडखड-खडखड आपटू लागली. त्याने मला विचारले, 'हे चक्रीवादळ आले आहे, सगळी दारे बंद करू का? मी म्हणालो सगळी दारे बंद करू नकोस, आत प्रवेश करण्यासाठी एक दरवाजा उघडा ठेव आणि बाहेर निघण्याचे दरवाजे बंद करून टाक, मग आत किती हवा येईल? भरलेली रिकामी होईल तेव्हाच हवा आत येईल ना?

नाही तर कितीही मोठे चक्रीवादळ असले तरी आत येणार नाही.' नंतर त्याला अनुभव घडवून दिला. तेव्हा तो म्हणाला, 'आता आत शिरत नाही.'

तर या वादळाचे असे आहे. लक्ष्मीला जर तुम्ही अडवली तर येणार नाही, जेवढी असेल तेवढी भरलेलीच राहील. आणि एकीकडून जाऊ द्याल तर दुसरीकडून येत राहील. अडवून ठेवली तर मात्र तेवढीच्या तेवढीच राहील. लक्ष्मीचे काम हे सुद्धा असेच आहे. म्हणून आता कोणत्या मार्गाने जाऊ द्यावी हे तुमच्या मर्जीवर अवलंबून आहे. ती मग बायको-मुलांच्या मौज-मजेसाठी जाऊ द्यावी, कीर्तीसाठी जाऊ द्यावी, ज्ञानदानासाठी जाऊ द्यावी, की मग अन्नदानासाठी जाऊ द्यावी? कशासाठी जाऊ द्यावी ते तुमच्यावर अवलंबून आहे, पण जाऊ द्याल तर दुसरी येईल. जाऊ दिली नाही, तर काय होईल? जाऊ दिली तर दुसरी येणार का? हो, येईल.

## बदललेल्या प्रवाहाच्या दिशा

किती प्रकारची दाने आहेत हे माहीत आहे का तुम्हाला? दानाचे चार प्रकार आहेत. बघा, एक आहारदान, दुसरे औषधदान, तिसरे ज्ञानदान आणि चौथे अभयदान.

## पहिले आहारदान

पहिल्या प्रकारचे जे दान आहे ते आहे अन्नदान. या दानासाठी तर असे म्हटले जाते की, भाऊ, एखादा मनुष्य आमच्या घरी येऊन म्हणेल की 'मला काही खायला द्या, मी उपाशी आहे.' तेव्हा म्हणावे 'बैस येथे जेवायला. मी तुला वाढतो.' हे झाले आहारदान. तेव्हा अक्कलवाले काय म्हणतील? या तगड्या माणसाला तुम्ही आता खाऊ घालाल पण मग परत संध्याकाळी खायला कसे घालाल? तेव्हा भगवंत म्हणतात, तू अशी अक्कल वापरू नकोस. या व्यक्तीने त्याला खाऊ घातले तर तो आजचा दिवस तरी जगेल. मग उद्या जगण्यासाठी त्याला कोणी तरी दुसरे भेटेल. उद्याचा विचार आपण करायचा नाही. आपल्याला

दुसऱ्या भानगडीत पडायचे नाही, की उद्या तो काय करील? उद्या त्याला परत मिळेल. यात तुम्हाला काळजी करण्याची गरज नाही की आपण नेहमी देऊ शकू की नाही? तुमच्याकडे आला आहे तेव्हा तुम्ही त्याला द्या. जे काही देता येईल ते द्या, आज तरी तो जगला, बस! मग उद्या त्याचा दुसरा काही उदय असेल. तुम्हाला फिकीर करण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** अन्नदान श्रेष्ठ मानले जाते?

**दादाश्री :** अन्नदान चांगले मानले जाते, परंतु अन्नदान किती देऊ शकता? नेहमीसाठी लोक देणार नाहीत ना! एक प्रहर खाऊ घातले तरी फार झाले. दुसऱ्या प्रहरी परत दुसरे मिळेल. पण आजचा दिवस, एक प्रहर तरी जिवंत राहिला ना? आता यातही लोक उरले-सुरलेच देतात की, नवीन बनवून देतात?

**प्रश्नकर्ता :** उरलेलेच देतात. स्वतःचा प्रश्न सोडवतात. उरलेच आहे तर आता काय करावे?

**दादाश्री :** तरीही त्याचा सदुपयोग करतात, माझ्या भावा! पण जर नवीन बनवून दिले तर मी म्हणेन की ते करेक्ट आहे. वीतरागांकडे काही नियम असतील की थापा मारलेल्या चालतील?

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही असे थापा मारून कसे चालेल?

**दादाश्री :** वीतरागांकडे तसे चालत नाही, इतर ठिकाणी चालेल.

## औषधदान

आणि दुसरे आहे औषधदान, ते आहारदानापेक्षा उत्तम मानले जाते. औषधदानाने काय होते? साधारण परिस्थिती असलेला मनुष्य जर आजारी पडला, तर तो इस्पितळात जातो. आणि तिथे कोणी तरी म्हणतो की, 'अरे डॉक्टरांनी सांगितले आहे, पण माझ्याजवळ औषध आणायला पन्नास रुपये नाहीत. म्हणून मी औषध कसे काय आणू? तेव्हा आपण म्हणावे

की, हे घे पन्नास रुपये औषधासाठी आणि दहा रुपये आणखी घे. किंवा मग कुठून तरी औषध आणून आपण त्याला मोफत द्यावे. आपण स्वत: पैसा खर्च करून औषधे आणून त्याला फ्री ऑफ कॉस्ट (मोफत) द्यावी. मग त्याने ते औषध घेतले तर तो बिचारा चार-सहा वर्ष जगेल. अन्नदानाच्या तुलनेने औषधदानाने अधिक फायदा आहे, समजले का तुम्हाला? कशात फायदा अधिक? अन्नदान चांगले की औषधदान?

**प्रश्नकर्ता :** औषधदान.

**दादाश्री :** औषधदानाला अन्नदानापेक्षा अधिक मूल्यवान मानले आहे कारण ते दोन महिने तरी जिवंत ठेवते. मनुष्याला थोडे जास्त काळ जिवंत ठेवते. वेदनेतून थोडी फार मुक्ती करविते.

बाकी, अन्नदान आणि औषधदान तर आपल्याकडे बायका, मुले सर्व सहज करत असतात. ते काही फार मूल्यवान दान नाही. पण तरी केले पाहिजे. असा जर कोणी आपल्याला भेटला, कोणी असा दु:खी मनुष्य आला, तर आपल्याकडे जे काही तयार असेल ते लगेच त्याला देऊन टाकावे.

## उच्च ज्ञानदान

मग त्याच्यापुढे ज्ञानदान म्हटले आहे. ज्ञानदानात पुस्तके छापावी, लोकांना समजावून त्यांना खऱ्या मार्गावर आणावे, आणि लोकांचे कल्याण व्हावे अशी पुस्तके छापून घ्यावी इत्यादी, हे झाले ज्ञानदान. ज्ञानदान दिले तर चांगल्या गतीत, उच्च गतीत जातो किंवा मग मोक्षालाही जातो.

म्हणून मुख्य दान हे ज्ञानदान असे भगवंतांनी म्हटले आहे. आणि जिथे पैशांची गरज नाही तिथे अभयदानाची गोष्ट सांगितली आहे. जिथे पैशांची देवाणघेवाण आहे तिथे हे ज्ञानदान सांगितले आहे. आणि साधारण परिस्थितीच्या, नरम परिस्थितीच्या लोकांना औषधदान व आहारदान द्यायला सांगितले आहे.

**प्रश्नकर्ता :** पण पैसे उरले असतील, तर त्याचे दान तर करावे ना?

**दादाश्री :** दान तर उत्तम आहे. जिथे दु:ख असेल तिथे त्यांचे दु:ख कमी करा आणि दुसरे सन्मार्गावर खर्च करा. लोक सन्मार्गावर जातील असे ज्ञानदान करा. या दुनियेत उच्च असे ज्ञानदान आहे! तुम्ही जरी एक वाक्य जाणले (शिकले) तरी केवढा लाभ होतो! मग हे पुस्तक लोकांच्या हातात आले तर केवढा लाभ होईल.

**प्रश्नकर्ता :** आता नीट लक्षात आले...

**दादाश्री :** हो, म्हणून ज्यांच्याकडे पैसा जास्त आहे, त्यांनी मुख्यत: ज्ञानदान केले पाहिजे.

तर आता हे ज्ञान कसे असावे? लोकांना हितकारी होईल असे ज्ञान असावे. हो, पण लुटारूंच्या कथा ऐकण्यासाठी नव्हे. असे ज्ञान तर खाली घसरवते. ते वाचल्यावर आनंद तर होतो, पण लोक खाली अधोगतीत जात राहतात.

## सर्वात श्रेष्ठ अभयदान

आणि चौथे आहे अभयदान. अभयदान म्हणजे आपल्यापासून कोणत्याही जीवाला किंचितमात्र त्रास होऊ नये, अशा प्रकारे वागणे. तेच अभयदान.

**प्रश्नकर्ता :** अभयदान जरा सविस्तर समजावून सांगा.

**दादाश्री :** अभयदान म्हणजे आपल्याकडून कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख होऊ नये. त्याचे एक उदाहरण देतो. मी सिनेमा बघायला जात असे, लहान वयात, बावीस पंचविसाव्या वर्षी. तर परत येतांना रात्रीचे बारा-साडेबारा वाजत असत. पायी चालत येत असे तर बुटांचा आवाज होत असे. त्याकाळी आम्ही बुटांना घोड्याची लोखंडी नाळ लावून घेत असू, म्हणून खटखट आवाज होत असे. रात्री आवाज जास्त येत असे. रात्री कुत्री बिचारी झोपलेली असत, आरामात झोपलेली

असत, ती कान टवकारून बघत. तेव्हा आम्ही समजून जात असू की तो बिचारा आमच्यामुळे दचकला. आम्ही असे कसे जन्माला आलो या मोहल्ल्यात की आमच्यामुळे कुत्रीही भितात. म्हणून आधीच, लांबूनच बूट काढून हातात घेऊन असे गुपचूप यायचो, पण त्याला दचकू देत नसू. हा लहान वयातील आमचा प्रयोग. आपल्यामुळे तो दचकला ना?

**प्रश्नकर्ता :** हो, त्याची झोप मोड झाली ना?

**दादाश्री :** हो, आणि तो दचकला की मग स्वत:चा स्वभाव सोडणार नाही. कधीतरी भुंकेलसुद्धा, स्वभावच आहे त्याचा. त्यापेक्षा त्याला झोपू दिले तर काय वाईट? त्यामुळे मोहल्ल्यात राहणाऱ्यावर भुंकणार तर नाही.

म्हणूनच अभयदान, कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख होऊ नये, असा भाव आधी ठेवावा. मग तो भाव आचरणात येईल. भाव केले तर आचरणात येतात, परंतु भावच केले नाहीत तर? म्हणूनच याला भगवंतांनी मोठे दान म्हटले आहे. यात पैशांची काही गरज नाही, सर्वात श्रेष्ठ दान हेच आहे. श्रीमंत असले तरीसुद्धा दान असे करू शकत नाहीत. म्हणून श्रीमंतानी लक्ष्मी देऊन (दान) पूर्ण केले पाहिजे.

ह्या चार प्रकारच्या दानाशिवाय आणखी कुठल्या प्रकारचे दान नाही, असे भगवंत सांगतात. बाकी, इतर प्रकारच्या दानाबद्दल जे बोलतात ती सर्व कल्पना आहे. ह्या चार प्रकारचीच दाने आहेत, आहारदान, औषधदान, ज्ञानदान आणि अभयदान. शक्यतो अभयदानाची भावना मनात बाळगावी.

**प्रश्नकर्ता :** पण अभयदानातूनच बाकीची तिन्ही दाने निघतात का? या भावनेतून?

**दादाश्री :** नाही, असे आहे की अभयदान तर उच्च कोटीचा मनुष्य करू शकतो. ज्याच्याकडे लक्ष्मी नसेल असा साधारण मनुष्यसुद्धा हे करू शकतो. उच्च पुरुषांकडे लक्ष्मी असो वा नसो. म्हणजे लक्ष्मीशी

त्यांचा व्यवहार नाही, परंतु अभयदान तर ते अवश्य करू शकतात. पूर्वी लक्ष्मीपती (श्रीमंत) अभयदान करत असत, परंतु आता त्यांच्याकडून हे होऊ शकत नाही, ते कच्चे पडतात. त्यांनी लक्ष्मीच मुळी लोकांना घाबरवून, धमकावून आणली आहे.

**प्रश्नकर्ता :** भयदान केले आहे ?

**दादाश्री :** नाही, असे म्हणू नये. असे करूनही ते ज्ञानदानात तर खर्च करतात ना ? तिथे वाटेल तसे करून आले असतील पण इथे ज्ञानदानात खर्च करतात ते उत्तम आहे, असे भगवंतानी म्हटले आहे.

## ज्ञानीच देतात 'हे' दान

म्हणून श्रेष्ठ दान अभयदान, दुसऱ्या क्रमांकावर ज्ञानदान. अभयदानाची प्रशंसा भगवंतांनीही केली आहे. पहिले, कोणीही तुमच्यामुळे भयभीत होऊ नये, असे अभयदान द्यावे. दुसरे ज्ञानदान, तिसरे औषधदान, आणि चौथे आहारदान.

ज्ञानदानापेक्षा श्रेष्ठ अभयदान! परंतु लोक अभयदान देऊ शकत नाहीत ना! फक्त ज्ञानीच अभयदान देतात. ज्ञानी आणि ज्ञानीचा परिवार असतो, ते अभयदान देतात. ज्ञानीचे फॉलोअर्स (अनुयायी) असतात ते अभयदान देतात. कोणालाही भय वाटू नये असे ते वागतात. समोरचा भयरहित राहू शकेल असे वागतात. कुत्राही घाबरणार नाही असे त्यांचे वर्तन असते. कारण कोणालाही दु:ख दिले की लगेचच ते दु:ख स्वत:च्या आत पोहोचते. समोरच्याला दु:ख दिले तर ते दु:ख आपल्या आत पोहोचते. तेव्हा आपल्यापासून कोणत्याही जीवाला किंचितमात्र भय वाटू नये असे वागावे.

## 'लक्ष्मी' तिन्हीमध्ये येते

**प्रश्नकर्ता :** मग काय लक्ष्मीदानाचे स्थानच नाही ?

**दादाश्री :** लक्ष्मीदान, हे ज्ञानदानात आले. आता तुम्ही पुस्तके छापून घेतलीत ना, तर लक्ष्मी त्यात आलीच, ते ज्ञानदान.

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मीमुळेच सगळे शक्य होते ना? अन्नदान देखील लक्ष्मीमुळेच देता येते ना?

**दादाश्री :** औषध द्यायचे असेल तरीही आपण शंभर रुपयांचे औषध आणून त्याला देऊ तेव्हाच ना? लक्ष्मी तर सगळ्यातच खर्च करायची आहे, परंतु लक्ष्मीचे अशा प्रकारे दान झाले तर ते सर्वात उत्तम!

## ती कशा प्रकारे द्यावी?

**प्रश्नकर्ता :** म्हणूनच दानात लक्ष्मीचे सरळ वर्णन नाही.

**दादाश्री :** हो, लक्ष्मी सरळ देऊही नये. ज्ञानदानाच्या रूपात म्हणजे पुस्तके छापून द्या किंवा मग खाऊ घालण्यासाठी जेवण वगैरे तयार करून द्या. सरळ लक्ष्मी देण्यास कोठेही सांगितलेले नाही.

## स्वर्ण दान

आपल्या धर्मात असे वर्णन आहे की पूर्वी तर सुवर्णमुद्रा दान करत असत, ती सुद्धा लक्ष्मीच म्हटली जाते ना?

**दादाश्री :** हो, ते सुवर्णमुद्रेचे दान होते ते तर ठराविक लोकानांच दिले जात होते. सर्वानांच दिले जात नव्हते. सुवर्णदान एक तर काही श्रमण ब्राम्हणांना, त्या सर्वांना की ज्यांच्या मुलींची लग्ने खोळंबली असत. आणि दुसरे त्यांचा संसार चालविण्यासाठी देत असत. इतर सर्वांना सुवर्णदान दिले जात नव्हते. जे व्यवहारात असतील, श्रमण असतील त्यांनाच द्यायला हवे. श्रमण म्हणजे ते कोणाकडून मागू शकत नसत. त्या काळी फार चांगल्या मार्गाने धन खर्च होत असे. हे तर आता ठीक आहे. देवाचे मंदिर बनवतात ते सुद्धा 'ऑन'च्या पैशाने बनवतात. या युगाचा हा परिणाम आहे ना!

## ज्ञानीच्या दृष्टीने

**प्रश्नकर्ता :** विद्यादान, धनदान या सगळ्या दानांमध्ये तुमच्या दृष्टीने कोणते दान श्रेष्ठ आहे? कित्येक वेळा मनात दुविधा उत्पन्न होते.

**दादाश्री :** विद्यादान उत्तम मानले जाते. लक्ष्मी असेल त्याने विद्यादान, ज्ञानदान यासाठी लक्ष्मी दिली पाहिजे. ज्ञानदान म्हणजे पुस्तके छापणे किंवा असे काही करणे. ज्ञानाचा प्रसार कसा व्हावा? त्यासाठीच पैसा खर्च केला पाहिजे. लक्ष्मी असेल त्याने व लक्ष्मी नसेल त्याने अभयदानाचा उपयोग केला पाहिजे. कोणालाही भय वाटू नये असे आपण जपून चालावे. कोणालाही दुःख वाटू नये, भीती वाटू नये, त्यास अभयदान म्हणतात.

दानाच्या बाबतीत लोक नाव कमावण्यासाठी दान देतात, ते योग्य नाही. नाव कमावण्यासाठीच तर स्मृतीस्तंभ उभारतात ना! स्तंभ तर कुणाचे राहिले नाहीत, आणि इथे दिलेले सोबत केव्हा येते? विद्या पसरेल, ज्ञान पसरेल असे काही कराल, तर ते आपल्या सोबत येते.

## उपयोगी पडेल ते पुस्तक कामाचे

**प्रश्नकर्ता :** लाखो धार्मिक पुस्तके छापली जातात पण कोणी वाचत नाही.

**दादाश्री :** ते ठीक आहे. तुम्ही बोलता ते खरे आहे, कोणी वाचत नाही. सगळी पुस्तके तशीच्या तशी पडून राहतात. वाचले जाईल असे पुस्तक असेल तर ते कामाचे. तुमचे म्हणणे बरोबर आहे. आता कोणतेही पुस्तक वाचले जात नाही. निव्वळ धार्मिक पुस्तके छापली जातात. ते महाराज काय म्हणतात, माझ्या नावाने पुस्तक छापा. महाराज स्वतःचे नाव टाकतात. स्वतःच्या दादागुरूंचे नाव टाकतात. म्हणजे, हे आमचे आजोबा होते, त्यांच्या आजोबांचे आजोबा व त्यांचेही आजोबा... तिथपर्यंत पोहोचतात. लोकांना कीर्ती कमवायची आहे. आणि त्यासाठी धर्माची पुस्तके छापतात. धर्माची पुस्तके अशी असली पाहिजेत की ज्ञान आपल्या उपयोगी व्हावे. अशी पुस्तके असली तर ती लोकांसाठी उपयोगी ठरतात. अशी पुस्तके छापली गेली तर ती कामाची, नाही तर उगाच धावपळ करत राहण्यात काय अर्थ? आणि ती सुद्धा सगळे लोक वाचत

नाहीत. एकदा वाचून ठेवून देतात. परत काही वाचत नाहीत. अरे, एकदा सुद्धा संपूर्ण वाचत नाहीत. लोकांना उपयोगी पडेल असे पुस्तक छापले तर आपल्या पैशांचा सदुपयोग होतो आणि ते सुद्धा पुण्य असेल तेव्हाच. पैसे चांगले असतील तेव्हाच छापू शकतो, नाही तर छापूही शकत नाही ना! तसे योगच येत नाहीत! पैसे तर येतील आणि जातील. क्रेडिट हे डेबिट झाल्याशिवाय राहणारच नाही. तुमच्या इथे कसा नियम आहे? क्रेडिटच होत राहते की डेबिट पण होते?

**प्रश्नकर्ता :** दोन्ही बाजू असतात.

**दादाश्री :** म्हणजे नेहमी क्रेडिट-डेबिट होतच राहते.

**प्रश्नकर्ता :** तसेच व्हायला हवे.

**दादाश्री :** पण त्याचे दोन मार्ग आहेत. डेबिट एक तर चांगल्या मार्गाने जाते किंवा गटारीत जाते. या पैकीच एका मार्गाने जाते. अख्ख्या मुंबईचे धन गटारीतच जात आहे. सगळेच धन गटारीत जाते.

## मुंबई म्हणजे पुण्यवंतांची जत्रा

**प्रश्नकर्ता :** मोठी-मोठी दाने मुंबईतच होतात. लाखो-करोडो रुपये दानात दिले जातात.

**दादाश्री :** हो, पण ते सर्व दान तर कीर्तीदान आहे. आणि काही गोष्टी चांगल्या आहेत. औषधदान होत असते, अशा अनेक चांगल्या गोष्टी आहेत. म्हणजे इतरही बरेच काही आहे मुंबईत.

**प्रश्नकर्ता :** त्या सर्वांना लाभ मिळतो की नाही?

**दादाश्री :** पुष्कळ लाभ मिळतो. ते तर सोडतच नाहीत ना हा लाभ! या मुंबईत केवढे अमाप धन आहे? या कारणामुळेच तर इथे किती तरी इस्पितळे आहेत! या मुंबईचे धन भरपूर आहे, समुद्राएवढे धन आहे, आणि ते समुद्रातच जाते.

**प्रश्नकर्ता :** मुंबईतच लक्ष्मी प्राप्त होते, त्याचे कारण काय?

**दादाश्री :** मुंबईतच लक्ष्मी प्राप्त होते. नियमच असा आहे की मुंबईत उत्तमातील उत्तम प्रकारची वस्तू खेचली जाऊन येऊन पडते.

**प्रश्नकर्ता :** हा भूमीचा गुण आहे का?

**दादाश्री :** भूमीचाच तर गुण आहे. मुंबईत उत्तमोत्तम वस्तू खेचल्या जातात. मिरच्याही उत्तम, महान पुरुष, तेही मुंबईतच होतात आणि सर्वात नीच, नालायक माणसे, तीसुद्धा मुंबईतच होतात. म्हणजे मुंबईत अशा दोन्ही क्वॉलिटीज असतात. गावात शोधायला जाल तर मिळणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मुंबईत समदृष्टी असलेले लोक आहेत ना?

**दादाश्री :** सगळी पुण्यवानांची जत्रा आहे. एका प्रकारे ही पुण्यवानांची जत्राच आहे. आणि सर्व पुण्यवान एकत्र खेचले जातात.

मुंबईचे लोक सर्व काही निभावून घेतात. ते तसे दुसरे काही करत नाहीत. स्वतःच्या पायावर कोणाचा पाय पडला ना, तर प्लीज, प्लीज करतात, मारत नाहीत, आणि गावात तर मारतात. म्हणून हे मुंबईचे लोक डेव्हलप्ड (विकसित) म्हटले जातात.

## धन चालले गटारीत

लोकांचे धन गटारीतच जात आहे ना, चांगल्या मार्गाने तर एखाद्या पुण्यवानाचेच जाते! धन गटारीत जाते का?

**प्रश्नकर्ता :** जातच आहे ना सगळे?

**दादाश्री :** या मुंबईच्या गटारीत तर पुष्कळ धन, ढीगभर धन निघून गेले आहे. निव्वळ मोहाचाच बाजार आहे हा! झपाट्याने धन निघून जाते. धनच खोटे आहे ना, धन पण खरे नाही. खरे धन असले तर ते चांगल्या मार्गाने खर्च होते.

सध्या संपूर्ण जगाचे धन गटारीत जात आहे. या गटारीचे पाईप रुंद केले आहेत. ते कशासाठी? तर धन जाण्यासाठी जागा पाहिजे ना? कमावलेले सर्व धन खाऊन-पिऊन गटारीत वाहून जाते. एक पैसाही खऱ्या मार्गावर जात नाही, आणि जे पैसे खर्च करतात, कॉलेजमध्ये दान दिले, अमके दिले ते सर्व इगोइजम (अहंकार) आहे. इगोइजमशिवाय पैसा दिला जाईल तर तो खरा म्हटला जातो. बाकी हे तर अहंकारालाच पोषण मिळत राहते; कीर्ती मिळत राहते. पण कीर्ती मिळाल्यानंतर त्याचे फळ मिळते. मग ती कीर्ती जेव्हा उलटते तेव्हा काय होते? अपकीर्ती होते. तेव्हा उपाधीच उपाधी होते. त्याऐवजी कीर्तीची अपेक्षाच ठेवू नये. कीर्तीची अपेक्षा ठेवली तर अपकीर्ती पण येईलच ना? ज्याला कीर्तीची अपेक्षाच नाही त्याला अपकीर्ती येईलच कशी?

## चांगल्या मार्गाने खर्च करा

पैसे तर संपतातही आणि घटकाभरात भरूनही निघतात. चांगल्या कामासाठी वाट बघू नये. चांगल्या कामात खर्च करा, नाही तर गटारीत तर गेलेच आहे लोकांचे धन. मुंबईत असे करोडो रुपये गटारीत गेले आहेत! घरात खर्च केला पण परक्यांसाठी खर्च केला नाही ते सर्व गटारीतच गेले. पण आता मात्र ते पश्चाताप करत आहेत. मी त्यांना म्हणतो की गटारीत गेले, तेव्हा म्हणतात, 'होय, असेच झाले.' मग मूर्खा! आधीच सावध राहायला हवे होतेस ना? आता परत येईल तेव्हा सावध रहा. तेव्हा म्हणतो, 'हो, आता मात्र कच्चा पडणार नाही.' (धन) परत तर येणारच ना! धन तर कमी जास्त होत राहील. कधी दोन वर्षे वाईट गेली, तर परत पाच-सात वर्षे चांगली येतात, असे चालतच राहते. पण चांगल्या मार्गाने खर्च केले ते तर कामी येणारच ना? तेवढेच आपले, बाकी सर्व परके.

एवढे सारे पैसे कमावले, पण कुठे गेले? तर गटारीत!! धर्मासाठी दिले का? तेव्हा म्हणतो पैसे तर मिळतच नाहीत, गोळा होतच नाहीत,

तर देऊ कसे? मग पैसे गेले कुठे? हे तर कोण पिकवतो आणि कोण खातो? जो कमावतो, त्याचे धन नाही, पण जो खर्च करतो त्याचे धन. म्हणून जेवढे नवीन ओवरड्राफ्ट पाठवाल तेवढे तुमचे. नाही पाठवले तर तुमचे तुम्ही बघा.

## दान म्हणजेच पेरून मग पीक घ्या

**प्रश्नकर्ता :** आत्मा आणि दान, यांचा काहीही संबंध नाही, तर मग दान करणे हे आवश्यक आहे की नाही?

**दादाश्री :** दान म्हणजे काय, तर द्या आणि घ्या. हे जग प्रतिध्वनी स्वरूप आहे. जसे तुम्ही कराल तसा प्रतिध्वनी ऐकायला मिळेल अगदी व्याजासकट मिळेल. म्हणून तुम्ही द्या व घ्या. हे सगळे मागच्या जन्मी दिले होते, चांगल्या कार्यासाठी पैसे खर्च केले होते, असे सर्व केले त्याचे आज आपल्याला फळ मिळाले. आता जर परत तसे केले नाही तर सगळे धुळीत मिळेल. आपण शेतातून चारशे मण गहू तर आणले पण त्यातले पन्नास मण पेरले नाही तर काय होणार?

**प्रश्नकर्ता :** तर उगवणार नाहीत.

**दादाश्री :** तर हे सर्व असे आहे, म्हणून द्यावे. त्याचा प्रतिध्वनी उमटेलच, परत येईल, अनेक पटीने येईल. मागच्या जन्मी दिले होते म्हणून तर अमेरिकेला आलात, नाही तर अमेरिकेला येणे सोपे आहे का? किती पुण्य केलेले असते तेव्हा विमानात बसायला मिळते. कित्येक लोकांनी तर विमान बघितलेले सुद्धा नाही.

## लक्ष्मी तिथेच परत येते

पूर्वी तुमचे घराणे श्रीमंत होते ना?

**प्रश्नकर्ता :** हो, सगळे पूर्वकर्मांचे पुण्य!

**दादाश्री :** किती तरी लोकांना मदत केली असेल तेव्हा लक्ष्मी

आपल्याकडे येते, नाही तर लक्ष्मी येणारच नाही ना! ज्याला घेण्याचीच इच्छा असेल, त्याच्याकडे लक्ष्मी येत नाही. आली तरी निघून जाते, टिकत नाही. कसेही करून घेऊच इच्छितो, त्याच्याकडे लक्ष्मी येत नाही. लक्ष्मी तर देण्याची इच्छा असणाऱ्यांकडेच येते. जो इतरांसाठी झिजतो, ठगला जातो, नॉबिलीटी राखतो, त्याच्याकडे येते. लक्ष्मी निघून गेली आहे असे वाटते खरे पण येऊन परत तिथेच उभी राहते.

## बघा, दान देण्यास चुकू नका

(पैसे) येतील तेव्हाच दिले जातील ना. आणि जवळ काही नसेल तेव्हा मनात काय विचार करतो, माहीत आहे का? जेव्हा माझ्याजवळ येतील तेव्हा द्यायचेच आहेत! आणि आले की लगेच थप्पी एकीकडे ठेवून देतो. मनुष्याचा स्वभाव कसा की नंतर देईन ना, आता माझ्याकडे दीड लाख आहे, दोन लाख पूर्ण होतील तेव्हा देईन. आणि असे करत करत ते राहून जाते. अशा कामात तर डोळे मिटून देऊन टाकले तेच खरे सोने!

**प्रश्नकर्ता :** दोन लाख जमा होतील तेव्हा खर्च करू, असे म्हणणारा मनुष्य असे म्हणत म्हणतच निघून गेला तर?

**दादाश्री :** तो निघून जातो आणि देण्याचेही राहून जाते. देऊच शकत नाही. जीवाचा स्वभावच असा आहे. जेव्हा नसतील तेव्हा म्हणेल, 'माझ्याकडे आले की मला लगेचच देऊन टाकायचे आहेत.' आले की लगेचच द्यायचे आहेत. आणि जेव्हा येतात तेव्हा मात्र ही माया त्याला गुरफटून टाकते.

आता समजा एखाद्या माणसाने साठ हजार रुपये परत केले नाहीत तर तो म्हणेल, 'चालेल आता. जाऊ दे, माझ्या नशीबात नव्हते.' तिथे पैसे सुटतात, पण येथे सुटत नाहीत. मनुष्याचा स्वभावच असा आहे. माया त्याला गुरफटून टाकते. दान तर हिम्मत केली तरच दिले जाते. म्हणून आम्ही असे म्हणतो की, 'काही तरी कर,' मग त्याला माया

गुरफटणार नाही. फूल नाही, तर फुलाची पाकळी! फक्त एका बोटाचा आधार देण्याचीच गरज आहे, आणि तेही आपापल्या क्षमतेनुसार. आजारी माणसालाही असा आधाराचा हात लावण्यास काय हरकत आहे?

## खरा दानवीर

कधीही कमी पडत नाही तिचे नाव लक्ष्मी. खोऱ्याने उपसून उपसून धर्मासाठी दान देत राहिले तरीही कमी पडत नाही तिला लक्ष्मी म्हणतात. इथे तर धर्मात दिले असेल तर वर्षभरात दोन दिवस दिले असेल, तिला लक्ष्मी म्हणतच नाहीत. एक दानवीर शेठ होते. त्यांचे नाव दानवीर कसे पडले? त्यांच्याकडे पिढ्यांपासून धन दिलेच जात होते. खोऱ्याने उपसूनच देत असत. जो येईल त्याला देत. आज अमका आला की मला मुलीचे लग्न करायचे आहे, तर त्याला दिले. कोणाला दोन हजारांची गरज असेल तर त्याला दिले. साधू-संतासाठी राहण्याची जागा बनवली होती आणि तिथे साधू-संताच्या भोजनाची व्यवस्थाही केली. म्हणजे जबरदस्त दान चालत असे, म्हणून तर दानवीर म्हणून ओळखले गेले. हे सारे आम्ही पाहिले होते. प्रत्येकाला देत असत आणि तसेतसे धन वाढत होते.

धनाचा स्वभाव कसा आहे? एखाद्या चांगल्या ठिकाणी दान दिले तर फारच वाढते, असा धनाचा स्वभाव आहे. आणि जर कोणाचे खिसे कापले तर तुमच्या घरी काहीही उरणार नाही. या सगळ्या व्यापाऱ्यांना गोळा करून आपण त्यांना विचारले की भाऊ! कसे काय चालले आहे? बँकेत दोन हजार तर असतील ना? तेव्हा म्हणतील, 'साहेब, वर्षभरात लाख रुपये आले पण हातात काहीही राहिले नाही.' म्हणूनच अशी म्हण आहे की चोराची आई कोठीत तोंड घालून रडते! कोठीत काहीच नसते मग रडणारच ना!

लक्ष्मीचा प्रवाह दान आहे; आणि जो सच्चा दानी आहे तो साहजिकच एक्सपर्ट (हुशार) असतो. मनुष्याला बघूनच समजून तो

जातो की हा जरा बरोबर वाटत नाही. म्हणून तो त्याला म्हणेल की भाऊ, मुलीच्या लग्नासाठी नगद पैसे मिळणार नाहीत, तुला जे कपडेलत्ते हवे असेल, आणखी जे काही हवे असेल ते सर्व घेऊन जा. आणि म्हणेल की तुझ्या मुलीला येथे घेऊन ये. मग मुलीला कपडे-दागिने वगैरे देतो. नातेवाईकांना मिठाई आपल्या घरून पाठवून सगळा व्यवहार सांभाळून घेतो. पण त्याला बरोबर समजते की हा बेशरम आहे. रोख पैसे हातात देण्यालायक नाही. म्हणजे दान देणारेही फार एक्सपर्ट असतात.

## दान कोणाला द्यावे?

तुम्ही गरीबाला पैसे दिले आणि नंतर तपास केला तर कळेल की त्यांच्याकडे तर पाऊण लाख रुपये आहेत. कारण ते लोक गरिबीच्या नावाखाली पैसे गोळा करतात. सगळा व्यापारच चालतो. दान तर कुठे द्यावे? तर जे लोक मागत नाहीत आणि आतल्या आत दु:खी होत असतात, दबून दबून चालतात, जे सामान्य लोक आहेत, तिथे दान द्यायचे आहे. त्या मध्यमवर्गीय लोकांना फार समस्या आहेत!

## दान, समजदारीपूर्वक

एका माणसाला मनात असे ज्ञान झाले. काय ज्ञान झाले? हे लोक थंडीने मरत असतील. इथे घरातही थंडीत राहवले जात नाही. अरे, हिमवर्षा होणार आहे आणि या फुटपाथवर राहणाऱ्यांचे काय होईल? असे त्याला ज्ञान झाले, हे एक प्रकारचे ज्ञानच म्हणाचे ना! ज्ञान झाले आणि त्याचा योग चांगला होता. बँकेत पैसा होता, म्हणून शंभर सव्वाशे घोंगड्या घेऊन आला, हलक्या क्वॉलिटीच्या. आणि दुसऱ्या दिवशी पहाटे चार वाजता जाऊन सगळ्यांना पांघरुण घातले, ते लोक जिथे झोपले होते तिथे जाऊन पांघरुण घातले. पाच-सात दिवसानंतर तो तिथे परत गेला तर घोंगड्या-बिंगड्या काहीच दिसत नव्हत्या, कारण सगळ्या नवीन घोंगड्या विकून पैसे मिळवले त्या लोकांनी!

म्हणून मी म्हणतो की असे देऊच नये. असे दिले जाते का

कधी ? त्यांना तर रविवारच्या बाजारात जुन्या घोंगड्या मिळतात ना, त्या आणून द्या. मग त्या तर कोणी बापही त्यांच्याकडून विकत घेणार नाही. आपण त्यांच्यासाठी सत्तर रुपयांचे बजेट ठेवले असेल तर सत्तर रुपयांची एक घोंगडी आणण्याऐवजी सत्तर रुपयांच्या जुन्या तीन मिळत असतील तर तीन घ्याव्या. म्हणवे तीन पांघरुणे घेऊन झोपून जा, मग कोणी बापही घेणारा मिळणार नाही.

या काळात दान द्यायचे असेल तर फार समजून उमजून द्यावे. पैसा मुळातच स्वभावाने खोटा आहे. दान देण्यासाठीही फार विचार कराल तेव्हा दान देऊ शकाल, नाही तर दानही देऊ शकणार नाही. पूर्वी खरा रुपया होता म्हणून जिथे देऊ तिथे खरे दानच होत असे.

आता नगद रुपया देऊ शकत नाही, पण कुठूनही खाण्याच्या वस्तू विकत घेऊन वाटाव्या. मिठाई आणली असेल तर मिठाई वाटावी. मिठाईचे पॅकेट दिले तर ते मिठाईवाल्याला म्हणतील ह्याची अर्धी किंमत देऊन टाक. आता या जगाचे काय करावे ? आपण आरामात चिवडा आहे, चुरमुरे आहेत, सफरचंद आहे, असे सर्व द्यावे. आणि भजी आणून ती त्यांना तोडून वाटावी. घे भाऊ ! त्यात काय हरकत आहे ? आणि हे दही पण घेऊन जा. नाही तर त्याला वाटेल भजी अशी तोडून का दिली ? अशी शंका येऊ नये म्हणून त्याला म्हणावे हे दही पण घेऊन जा, म्हणजे दहीवडे बनतील. अरे ! पण काय करावे मग ? असे काही तरी केलेच पाहिजे ना ?

याला कसे बरे पूरून उरायचे ? हो, आणि मागायला येतील तेव्हा पण द्या. पण नगद देऊ नका; कारण दुरुपयोग होतो ह्या सगळ्याचा. आपल्या देशातच हे असे चालले आहे. या इंडियन पझलला (भारतीय कोड्याला) जगात कोणीही सोडवू शकत नाही.

हे कसे ? हे काय आहे ? हे कोडे सोडवायला कोणाला पाठविले की बाबा, आमच्याकडे हे काय चालले आहे ? घोंगड्या दानात दिल्या

होत्या त्या कुठे गेल्या? त्या शोधून काढा. तेव्हा ते म्हणतील की सी.आई.डी ला बोलवा. अहो, हे सी.आई.डी.चे काम नाही. आम्ही तर हे सी.आई.डी.शिवायही पकडून देऊ. ही इंडियन पझल आहे. तुमच्याकडून सोल्व होणार नाही. तुमच्या देशात सी.आई.डी.कडून पकडवून आणता. आमच्या देशात लोक काय करतात ते सर्व आम्ही जाणतो रे बाबा! दुसऱ्या दिवशी जाऊन बघ त्या व्यापाऱ्याकडे.

तर आता पैशात बरकत कशी येईल? काही नियम असले पाहिजेत किंवा नीती असली पाहिजे. थोडी तरी असलीच पाहिजे ना? काळ जरा विचित्र आहे, तेव्हा साधारण नीति तर असलीच पाहिजे ना? असेच काही चालेल का?

सगळे विकून खातात, अरे, पैशांसाठी मुली पण विकल्या आहेत. इथपर्यंत पोहोचलेत ते शेवटी! अरे, असे करू नये.

दान देतांना नगदी रुपये देऊ नये. त्याला मेन्टेनन्स (व्यवस्थापना) साठी मदत करावी. काम-धंद्यावर लावावे. हिंसक मनुष्याला रुपये दिले तर तो जास्त हिंसा करेल.

## दान, परंतु उपयोगपूर्वक

पैसा खर्च होऊन जाईल अशी जागृती ठेऊच नये. ज्या वेळी जो खर्च होईल तो खरा! म्हणूनच पैसा खर्च करायला सांगितले, जेणे करून लोभ सुटेल व वारंवार देता येईल.

उपयोग तीच जागृती आहे. आम्ही शुभ कार्य करू, दान देऊ, पण ते दान कसे? तर जागृतीपूर्वक दिलेले दान, जेणेकरून लोकांचे कल्याण होवो. आपल्याला कीर्ती, प्रसिद्धी, प्राप्त होऊ नये यासाठीच तर आपण गुप्तपणे दान देत असतो. यालाच जागृतीपूर्वक म्हटले जाईल ना! यालाच उपयोग म्हणतात, आणि ते दुसरे तर त्यांचे नाव छापले नाही तर पुन्हा कधी दान देत नाहीत.

शुभमार्गातही जागृती केव्हा मानली जाईल? या जन्मात व दुसऱ्या जन्मात लाभदायी ठरेल, असे शुभ असेल तेव्हा तिला जागृती म्हणायची. नाही तर, तो दान करत असेल, सेवा करत असेल पण त्याला पुढची जागृती अजिबात राहत नसते. जागृतीपूर्वक सगळ्या क्रिया केल्या तर पुढच्या जन्माचे हित होईल, अन्यथा सर्व झोपेतच जाईल. हे जे दान दिले ते सगळे झोपेत गेले. जागृत अवस्थेत चार आणे जरी गेले तरी फार झाले. दान दिले पण मनात इथल्या कीर्तीची इच्छा असेल, तर सगळे झोपेत गेले समजावे. पुढच्या जन्माच्या हितासाठी जे दान इथे दिले जाते तो जागृत म्हटला जातो. हिताहिताचे भान, म्हणजे स्वतःचे हित कशात आहे व स्वतःचे अहित कशात आहे त्याप्रमाणे जागृती असणे! पुढच्या जन्माचा काही ठिकाणा नसेल आणि इथे दान देत असेल त्याला जागृत कसे म्हणावे?

## असे अंतराय पडतात

हा भाऊ कोणाला दान देत असेल, तेव्हा जर कोणी बुद्धिवान म्हणेल की, 'अरे, याला का देत आहेस?' त्यावर तो भाऊ म्हणेल, 'अरे, देऊ दे ना, गरीब आहे.' असे म्हणून तो दान देतो आणि तो गरीब घेतो. पण तो बुद्धिवान जो बोलला त्यामुळे त्याने अंतराय टाकला. म्हणून मग त्याला त्याच्या दुःखातही कोणी दाता भेटणार नाही. स्वतः जिथे अंतराय टाकतो, त्याच जागेवर तो अंतराय काम करतो.

**प्रश्नकर्ता :** वाणीने अंतराय टाकले नसतील पण मनाने अंतराय टाकले असतील तर?

**दादाश्री :** मनाने टाकलेल्या अंतरायांचा जास्त परिणाम होतो. ते मग पुढील जन्मात परिणाम करतात. आणि ह्या वाणीने बोललेल्याचा परिणाम या जन्मात होतो. वाणी निघाली की नगदी झाले, कॅश झाले. म्हणून त्याचे फळसुद्धा नगद येते आणि मनाने जे चित्रण केले ते तर पुढच्या जन्मी रूपक होऊन येणारच.

## आणि असे दूर होतात अंतराय

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अशी जागृती ठेवावी की थोडासा पण उलट-सुलट विचार येता कामा नये.

**दादाश्री :** नाही, असे होणे शक्य नाही. असे विचार आल्याशिवाय राहणारच नाहीत. त्या विचारांना आपण संपवून टाकणे, तेच आपले काम. असे विचार येऊ नयेत असे आपण ठरवले, याला निश्चय म्हणतात, परंतु विचारच येणार नाहीत, हे शक्य नाही. विचार तर येतील, पण बंध पडण्यापूर्वी त्यांना संपवून टाकावे. तुम्हाला विचार आला की 'याला दान द्यायचे नाही.' परंतु तुम्हाला ज्ञान दिले आहे त्यामुळे तुम्हाला जागृती येईल की मी यात अंतराय का टाकले? मग त्या विचाराला तुम्ही संपवून टाकता. पत्र पोस्टात टाकण्यापूर्वी लिहिलेले खोडून टाकले तर हरकत नाही ना! पण ज्ञानाशिवाय तर कोणी खोडत नाही ना! अज्ञानी तर खोडतच नाही. आपण जर त्याला विचारले की तू असा चुकीचा विचार का केलास? तर तो म्हणेल, 'असे तर करायलाच हवे होते, तुम्हाला ते समजणार नाही.' असे बोलून तो उलट दुप्पट गाढ करतो. अहंकार असा वेडेपणाच करतो, नुकसान करतो, त्याचेच नाव अहंकार. स्वतःच स्वतःच्या पायावर कुऱ्हाडी मारतो, त्याचे नाव अहंकार.

आता तर आपण पश्चाताप करून सगळे मिटवू शकतो आणि मनात निश्चय करतो की असे बोलता कामा नये. आणि जे बोलले गेले त्याबद्दल क्षमा मागतो तर सर्व मिटून जाईल. कारण हे पत्र अजून पोस्टात गेलेले नाही. त्या अगोदरच आपण फेरबदल केला की पूर्वी आम्ही जो विचार केला होता की दान देऊ नये, तो विचार चुकीचा आहे, पण आता आम्ही विचार करतो की 'दान देणे चांगले आहे.' त्यामुळे पूर्वीचे सर्व मिटून जाईल.

दान देणे, लोकांवर उपकार करणे, ऑब्लाइजिंग नेचर ठेवणे, लोकांची सेवा करणे, या सर्वाला रिलेटिव्ह धर्म म्हटले आहे, त्यामुळे

पुण्य बांधले जाते. आणि शिव्या दिल्याने, मारामारी करण्याने, लुटण्याने पाप बांधले जाते. जिथे पुण्य आणि पाप आहेत तिथे रियल धर्मच नाही. पाप-पुण्यरहित धर्म हा रियल धर्म आहे.

## पाचवा हिस्सा परक्यांसाठी

**प्रश्नकर्ता :** पुढच्या जन्माचे पुण्य प्राप्त करण्यासाठी या जन्मात काय करावे?

**दादाश्री :** या जन्मात जो पैसा येईल त्याचा पाचवा हिस्सा देवळात देवाजवळ ठेवावा किंवा लोकांच्या सुखासाठी खर्च करावा. त्यामुळे तेवढा तरी ओव्हरड्राफ्ट तिथे पोहोचला! सध्या मागच्या जन्माचे ओवरड्राफ्टच तर तुम्ही उपभोगत आहात. या जन्माचे जे पुण्य आहे, ते नंतर पुढे येईल. आताची कमाई पुढे चालेल.

## रिवाज, देवासाठीच धर्मात दान

आम्ही जेव्हा मारवाडी लोकांकडे जातो तेव्हा त्यांना विचारतो की, 'व्यापार कसा चालत आहे?' तेव्हा ते म्हणतात, 'धंदा तर चांगला चालला आहे.' 'मग फायदा वगैरे?' तेव्हा म्हणतात, 'दोन-चार लाख तरी आहेत.' 'देवाकडे दान देता का?' 'वीस पंचवीस टक्के देत असतो तिथे, दरवर्षी.' त्यांचे काय म्हणणे की शेतात पेराल तर दाणे उगवतील ना? पेरल्याशिवाय दाणे घ्यायला कसे जाऊ? पेरलेच नाही, तर? या मारवाड्यांकडे हीच पद्धत आहे की देवाच्या कामासाठी द्यायचे. ज्ञानदानासाठी, देवासाठी, अशा सर्व ठिकाणी दान द्यायचे पण इतर ठिकाणी नाही, हायस्कूलमध्ये किंवा ह्याला, त्याला देणे असे नाही. बस हेच एक.

## देवळात की गरिबांना

**प्रश्नकर्ता :** आम्ही त्या देवळात गेलो होतो, तर तिथे लोक करोडो रुपये दगडामागे खर्च करतात. आणि भगवंत म्हणतात की हे

तर जिवंत अंतर्यामी आहेत आणि ते प्रत्येक जीवमात्रात विराजमान आहेत. अशा जिवंत लोकांना धमकावतात, त्यांना छळतात आणि येथे दगडाच्या मूर्तीमागे करोडो रुपये खर्च करतात, असे का?

**दादाश्री :** हो, त्या बिचाऱ्यांना छळतात ते तर अज्ञानतेमुळे छळतात ना! क्रोध-मान-माया-लोभ यांच्या निर्बलतेमुळे त्यांना छळतातना!

असे आहे, हे जे पैसे कमावायला निघतात ना, चांगल्या प्रकारे घर चालत असले तरी पैसे कमावायला निघतात. तेव्हा आपल्याला हे समजतेच ना की हे स्वतःच्या क्वोट्या (वाट्या)व्यतिरिक्त जास्त क्वोटा मिळवण्याच्या मागे आहेत. जगात तर सर्वांचा क्वोटा समान आहे. पण जे लोभी आहेत ते जास्तीचा क्वोटा मिळवून घेतात. म्हणूनच काही लोकांच्या वाट्याला काहीच येत नाही. आणि तेसुद्धा असेच थापा मारून मिळत नाही, तर ते पुण्यानेच मिळते.

तेव्हा (मागील जन्मी) पुण्य जास्त केले होते म्हणून आता आपल्याकडे धन आले, आणि ते धन परत आपण खर्च करून टाकतो. आपल्याला असेच वाटते की हे जमा होत आहे पण खर्च केले तर डिडक्शन (कमी) पण होऊ शकते ना? पुण्य जमा तर होऊनच जाते, पण ते डिडक्शन करण्याची रीत तर जाणून घेतली पाहिजे ना?

म्हणजे लोक मंदिर वगैरे बनवतात, बरोबर करतात. त्यांना तर चावी हवी आहे. त्यांना दर्शन थोडेच करायचे आहे? ते जेथे दर्शन करायला जातात, तिथे त्यांना लाज वाटू नये असे त्यांना हवे असते. जिवंत माणसांसमोर त्याला लाज वाटते पण मूर्तीच्या समोर तर तुम्ही म्हणाल तसे तो नाचेलसुद्धा! नाचत राहतो एकटाच! पण जिवंतांसमोर त्याला लाज वाटते. या मूर्त्या जिवंत नाहीत ना, आणि जिवंतांसमोर तर काही होऊ शकत नाही. जिवंतांसमोर जर केले तर त्याचे कल्याणच होऊन जाईल, परमकल्याण होईल, आत्यंतिक कल्याण होईल. पण अशी शक्ती नसते ना! असे पुण्यही नसते!

देवाजवळ जे ठेवाल ते सगळे निष्काम नाही, सकाम आहे. हे देवा, मुलाच्या घरी मुलगा व्हावा! माझा मुलगा पास व्हावा. घरी म्हातारा बाप आहे त्याला पक्षाघात झाला आहे, तो बरा व्हावा, त्यासाठी दोनशे एक ठेवतो. पण येथे आपल्याकडे कोण ठेवणार? आपल्याकडे असा कारखाना आहे का? आणि इथे घेणाराही कोण आहे की तो ठेवेल?

## ती पण हिंसाच

**प्रश्नकर्ता :** व्यापारी जास्त नफा मिळवतात, एखादा उद्योगपती किंवा व्यापारी मेहनतीच्या तुलनेने कमी मजुरी देतात किंवा विना मेहनतीने जे काही कमावतात, ती तर हिंसाच म्हटली जाईल ना?

**दादाश्री :** ती सर्व हिंसाच आहे.

**प्रश्नकर्ता :** आता जर का तो फुकटची कमाई करेल आणि धन धर्मासाठी खर्च करेल तर ती कोणत्या प्रकारची हिंसा म्हटली जाते?

**दादाश्री :** जितका पैसा धर्मकार्यासाठी खर्च केला, जितका त्याग केला, तितका कमी दोष लागतो. जितके पैसे तो कमावतो, समजा लाख रुपये कमावले व त्यातील ऐंशी हजाराचा दवाखाना बनवला तर तितक्या रुपयांची जबाबदारी त्याला राहिली नाही. वीस हजाराचीच जबाबदारी राहिली. म्हणजे ते चांगले आहे, चुकीचे नाही.

**प्रश्नकर्ता :** लोक लक्ष्मी जमा करून ठेवतात, ती हिंसा म्हटली जाईल की नाही?

**दादाश्री :** हिंसाच झाली ती. जमा करून ठेवणे ती हिंसा आहे. दुसऱ्यांच्या कामी लागत नाही ना!

## जसे येतात तसे जातात

हे तर देवाच्या नावावर, धर्माच्या नावावर सगळे चालत आहे.

**प्रश्नकर्ता :** दान देणारा मनुष्य तर असे मानतो की मी तर श्रद्धेने

दिले आहे. पण ज्याला खर्च करायचे आहे तो कसे खर्च करतो, ते आम्हाला कसे कळेल?

**दादाश्री :** पण आपले पैसे जर खोटे असतील तर चुकीच्या मार्गाने जातील. जितके धन खोटे तितके वाईट मार्गाने जाते आणि धन जितके चांगले असेल तितके चांगल्या मार्गाने जाते.

## ऐरणीची चोरी, सुईचे दान

**प्रश्नकर्ता :** बरेच जण असे म्हणतात की दान केले तर तो देव बनतो, ते खरे आहे काय?

**दादाश्री :** दान केले, तरी नरकात जातील, असे पण लोक आहेत. कारण ते दान कोणाच्या तरी दबावात येऊन करतात. असे आहे की आता या दूषमकाळात लोकांजवळ दान देता येईल अशी लक्ष्मीच नसते. दूषम काळातील जी लक्ष्मी आहे ती तर अघोर कर्तव्याची लक्ष्मी आहे. म्हणून त्या लक्ष्मीचे दान दिले तर उलट नुकसान होते. तरी पण आपण कोणी दु:खी मनुष्याला दिले, दान देण्याऐवजी त्याची समस्या दूर करण्यासाठी काही केले तर ते चांगले आहे. दान तर नाव कमावण्यासाठी करतात, त्याला काय अर्थ? उपाशी असेल तर खायला द्या, कपडे नसतील तर कपडे द्या. बाकी, या काळात दान देण्यासाठी रुपये कुठून आणणार? तेव्हा सगळ्यात चांगले तर, दान-बीन देण्याची गरज नाही. आपले विचार चांगले करा. दान देण्यासाठी धन कुठून आणावे? खरे धन आलेच नाही ना! आणि खरे धन सरप्लस राहतच (उरतच) नाही. हे जे मोठे मोठे दान देतात ना, ते सर्व खात्याबाहेरचे, वरचे धन आले आहे, ते आहे. तरी पण जे दान देतात त्यांच्यासाठी चुकीचे नाही. कारण वाईट मार्गाने मिळवले व चांगल्या मार्गाने दिले, तरी पापापासून मुक्त तर झाला! शेतात बी पेरले गेले, म्हणून उगवले आणि तेवढे तरी फळ मिळाले.

**प्रश्नकर्ता :** भक्तिपदांमध्ये एक ओळ आहे ना, की तस्करी करणारे सुईदानाने सुटू इच्छितात. तर यात एका ठिकाणी तस्करी (चुकीच्या

मार्गाने खूप सारे धन कमावणे) केली आणि दुसऱ्या ठिकाणी दान केले, तर त्याने तेवढे तरी प्राप्त केले ना? असे म्हणू शकतो का?

**दादाश्री :** नाही, प्राप्त झाले असे म्हणता येणार नाही. ती तर नरकात जाण्याची निशाणी म्हटली जाईल. तो तर दानत चोर आहे. तस्कराने चोरी केली आणि सुईचे दान दिले. त्या ऐवजी दान नाही दिले पण सरळ राहिला तरी बरे. सहा महिन्याची जेलची शिक्षा बरी. मध्ये दोन दिवस बागेत घेऊन जातील, त्याला काय अर्थ?

ते काय सांगू इच्छितात की हा सगळा काळा बाजार, तस्करी वगैरे केली आणि नंतर पन्नास हजार दान दिले, जेणे करून स्वतःचे नाव खराब दिसू नये, स्वतःचे नाव खराब दिसू नये म्हणून दान दिले, यालाच सुईचे दान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे सात्विक लोक तर आता नाहीत ना?

**दादाश्री :** अशी संपूर्ण सात्विकतेची आशा तर ठेवूच शकत नाही! पण हे कोणासाठी आहे, की जे मोठे लोक करोडो कमावतात आणि इथे लाख रुपयांचे दान देतात. ते कशासाठी? तर स्वतःचे नाव खराब होऊ नये. या काळातच असे सुईचे दान होत असते. हे खूप समजण्यासारखे आहे. इतर लोक दान देतात, त्यातील काही सद्‌गृहस्थही असतात. साधारण परिस्थितीचे असतात. ते लोक दान देतात त्यात हरकत नाही. हे तर सुईचे दान देऊन स्वतःचे नाव बिघडू देत नाहीत. आपले नाव झाकण्यासाठी कपडे बदलून टाकतात! फक्त देखाव्यासाठी असे दान देतात!

सध्या तर लोक धनदान देतात की घेतात? आणि दान देतात तेसुद्धा 'मिसा'चे (तस्करीचे).

## ते धन पुण्य बांधते

**प्रश्नकर्ता :** दोन नंबरच्या पैशांचे दान दिले, तर ते नाही चालणार?

**दादाश्री :** दोन नंबरचे दान चालणार नाही. पण तरीही कोणी मनुष्य उपाशी मरत असेल आणि त्याला दोन नंबरचे दान दिले तर त्याला खाण्यासाठी तर चालेल ना? दोन नंबरच्या पैशात थोड्यासा कायदेशीर अडचणी येतात. पण दुसरी कुठली हरकत नाही. ते धन आपण हॉटेलवाल्याला दिले तर तो घेणार की नाही?

**प्रश्नकर्ता :** घेणार.

**दादाश्री :** हो, मग व्यवहार सुरूच होतो.

**प्रश्नकर्ता :** हल्लीच्या काळात दोन नंबरचा पैसा आहे, तो धर्मात खर्च होतो, तर त्याने पुण्य प्राप्त होते काय?

**दादाश्री :** नक्कीच होते! त्याने तेवढा त्याग केला ना! स्वतः जवळ आलेल्या पैशांचा त्याग केला ना! पण त्यात मग हेतूनुसार पुण्य बांधले जाते. हेतू असेल त्यानुसार. पैसे दिले, ही एकच गोष्ट बघितली जात नाही. पैशांचा त्याग केला हे निर्विवाद आहे. बाकी पैसा कुठून आला? हेतू काय आहे? हे सर्व वजा-बेरीज होत-होत जे बाकी राहते ते त्याचे. त्यांचा हेतू काय, तर सरकार घेऊन जाईल त्यापेक्षा येथेच देऊन टाका ना!

## निरपेक्ष लुटवा

**प्रश्नकर्ता :** ऑन चे पैसे भले खर्च होत असतील, पण तरी धर्माची ध्वजा लागतेच की धर्माच्या नावावर खर्च केले.

**दादाश्री :** हो, पण धर्माच्या नावावर खर्च केले तर चांगले आहे. पण ऑनच्या नावाने करतात. कारण ऑन हा मोठा गुन्हा नाही. 'ऑन' म्हणजे काय की जो सरकारी टॅक्स आहे, तो लोकांना जड जातो, की तुम्ही आमच्या अपेक्षेपेक्षा जास्त टॅक्स आकाराता म्हणून हे लोक लपवतात.

**प्रश्नकर्ता :** काही तरी प्राप्त करण्याच्या अपेक्षेने जे दान करतात, त्याला पण शास्त्रात मनाई नाही. त्याची निंदा केलेली नाही.

**दादाश्री :** अशी अपेक्षा ठेवली नाही तर उत्तमच आहे, अपेक्षा ठेवली की ते दान निर्मूल झाले, सत्वहीन झाले, असे म्हटले जाते. पाचच रुपये द्या पण अपेक्षेरहित द्या.

## ते आहे केमोफ्लेजसारखे

**प्रश्नकर्ता :** दोन नंबरचा जो पैसा आहे, तो जिथे जाईल तिथे गडबड होणार की नाही?

**दादाश्री :** ते पैसे पूर्ण मदत करत नाहीत, आमच्या येथे पण येतात, पण ते किती असतात? दहा ते पंधरा टक्के, त्याहून जास्त नाही.

**प्रश्नकर्ता :** तो पैसा धर्मात मदत करत नाही का? जिथे जाईल तिथे तेवढी तरी मदत होईल ना?

**दादाश्री :** मदत होत नाही. तसे दिसतांना मदत केलेली दिसते, पण नंतर अस्त व्हायला वेळ लागत नाही. हे सगळे वॉर क्वॉलिटीचे स्ट्रक्चर. वॉर क्वॉलिटीचे स्ट्रक्चर बांधतात सगळे! तुम्ही पाहिले ना! हे सर्व केमोफ्लेज (ढोंग) आहे. केमोफ्लेजपासून कसे खुश व्हायचे?

## श्रेष्ठी-शेट्टी-शेठ-शठ

पूर्वीच्या काळात दानवीर असत. दानवीर तर मन-वचन-काया यांची एकता असेल तरच जन्माला येतात, आणि त्यांना भगवंतांनी श्रेष्ठी म्हटले होते. त्या श्रेष्ठींना आता मद्रासमध्ये शेट्टी म्हणतात. अपभ्रंश होत-होत श्रेष्ठी चे शेट्टी झाले तिथे. आणि तेच आपल्या येथे अपभ्रंश होत होत 'शेठ' झाले आहे.

मी एका मिलच्या शेठजीकडे गेलेलो तेव्हा त्यांच्या सेक्रेटरीशी बोलत होतो, मी विचारले, शेठ कधी येणार? बाहेरगावी गेले आहेत का ते? तो म्हणाला चार-पाच दिवस लागतील. नंतर मला म्हणाला, जरा माझे बोलणे ऐका, मी म्हणालो 'हो भाऊ.' तर तो म्हणाला, 'वरची

मात्रा काढून टाकण्यासारखे आहे.' मी त्याला समजावले की, 'आता तू पगार खातोस, तोपर्यंत असे बोलू नकोस.' बाकी मात्रा काढली तर शेष काय उरले?

**प्रश्नकर्ता :** 'शठ' उरले.

**दादाश्री :** पण तरी आपण असे बोलू शकत नाही. अशी दशा झाली आहे! जगडुशा वगैरे सगळे कसे शेठ झाले होते! त्यांना सर्व शेठ म्हणत.

## जसा भाव, तसे फळ

कित्येकांना दान द्यायचे नसते, त्यांच्या मनात तर नसते पण ते वाणीने म्हणतात की मला द्यायचे आहे, आणि वर्तनातही तसे ठेवतात आणि दान देतातही. परंतु त्यांच्या मनात द्यायचे नाही असे असल्यामुळे त्याचे फळ मिळत नाही.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, असे का होते?

**दादाश्री :** एक मनुष्य मनाने देतो, कारण त्याच्याकडे तेवढी सोय नाही आणि वाणीने तो असे बोलतो की मला द्यायचे आहे पण मी देऊ शकत नाही. त्याचे फळ त्याला पुढच्या जन्मी मिळते, कारण ते दिल्यासारखेच आहे. देवाने स्वीकार केला. अर्धा लाभ तर झालाच.

देवळात जाऊन एका मनुष्याने दानपेटीत एकच रुपया टाकला आणि दुसऱ्या एका शेठने एक हजार रुपये टाकले, ते पाहून तुमच्या मनात आले की अरे, माझ्याजवळ असते तर मी पण दिले असते. ते तुमचे तिथे जमा होतात. तुमच्याजवळ नाहीत, म्हणून तुमच्याकडून दिले जात नाही. येथे तर दिले त्याची किंमत नाही, भावनेची किंमत आहे. हे वीतरागांचे विज्ञान आहे.

आणि जो देणारा आहे, त्याचे किती तरी पट होईल. पण ते

कसे? तर जेव्हा मनापासून द्यायचे आहे, वाणीने द्यायचे आहे, वर्तनाने द्यायचे आहे, असे असेल तर त्याचे फळ या जगात काय नसेल ते विचारा! आता तर सगळे म्हणतील, त्या अमक्यामुळे मला द्यावे लागले, नाही तर मी दिले नसते. त्या साहेबाने दबाव घातला म्हणून मला द्यावे लागले. मग तिथे तुमचे जमाही तसेच होते, बरं का! आपण मनापासून, राजीखुशीने दिलेले कामी येते. असे करतात का लोक? कुणाच्या दबावामुळे देतात का?

**प्रश्नकर्ता :** हो, हो!

**दादाश्री :** अहो, कित्येक तर आपला रुबाब जमवण्यासाठी देतात. नावासाठी, स्वतःची अब्रू वाढविण्यासाठी देतात. मनात तर असे असते, की जाऊ द्या ना! देण्यासारखे तर नाही, पण आमचे नाव खराब होईल, तेव्हा मग तसे फळ मिळते. मनात जसे चित्रित करतात तसे फळ मिळते. आणि एखाद्या मनुष्याजवळ पैसे नसतील पण तरी तो 'माझ्याजवळ असते तर मी दिले असते.' असे तो म्हणेल, तर त्याला कसे फळ मिळेल?

## स्थूल कर्म : सूक्ष्म कर्म

एका शेठने पन्नास हजार रुपयांचे दान दिले. त्यावर त्यांच्या मित्राने त्यांना विचारले, एवढे सारे रुपये दिले? तेव्हा शेठ म्हणाले, 'मी तर एक पैसा पण देणाऱ्यापैकी नाही.' हे तर मेयरच्या दबावामुळे मला द्यावे लागले; आता याचे फळ तिथे काय मिळेल? पन्नास हजारांचे दान केले ते स्थूल कर्म, तर त्याचे फळ शेठजीला इथल्याइथेच मिळेल, लोक वाह-वाह करतील, कीर्ती गातील, आणि शेठजीने आत, सूक्ष्मकर्मात काय चार्ज केले? तर 'एक पैसा पण देणाऱ्यापैकी नाही मी.' या बोलण्याचे फळ पुढच्या जन्मी मिळेल. पुढच्या जन्मी शेठ एक पैसासुद्धा दान देऊ शकणार नाही. आता अशी सूक्ष्म गोष्ट कोणाला समजेल?

तिथेच दुसरा एखादा गरीब राहत असेल, त्याच्याकडे सुद्धा हेच

लोक दान घेण्यासाठी गेले. तेव्हा तो गरीब मनुष्य काय सांगतो, 'माझ्याकडे तर आता पाचच रुपये आहेत, तर हे सगळेच घ्या. पण माझ्याकडे जर आता पाच लाख असते तर मी ते सगळेच्या सगळे तुम्हाला दिले असते,' असे तो मनापासून म्हणतो. आता त्याने पाचच रुपये दिले, ते डिस्चार्जमध्ये कर्मफळ आले. पण आत सूक्ष्ममध्ये (नवीन) काय चार्ज केले? पाच लाख रुपये देण्याचे. म्हणून पुढच्या जन्मी तो पाच लाख देऊ शकेल, डिस्चार्ज होईल तेव्हा.

एक मनुष्य नेहमी दान करत असतो, धर्माची भक्ती करत असतो, मंदिरात पैसे देत असतो, दिवसभर असे सर्व धर्म करत असेल, त्याला जग काय म्हणेल की हा धर्मनिष्ठ आहे. परंतु त्या माणसाच्या मनात काय असते की मी पैसे कसे गोळा करू? आणि कसे ते उपभोगू? मनातून तर त्याला बिन हक्काची लक्ष्मी हडप करण्याची फार इच्छा होत असते. बिन हक्काचे विषय भोगण्यासही तो तयार असतो!

म्हणून भगवंत त्याचा एक पैसाही जमा करत नाहीत. त्याचे काय कारण? कारण हेच की ते सगळे स्थूल कर्म आहे. आणि त्या स्थूल कर्माचे फळ इथल्याइथेच मिळते. लोक या स्थूल कर्मालाच पुढच्या जन्माचे कर्म मानतात. पण त्याचे फळ तर इथल्याइथेच मिळून जाते. आणि सूक्ष्म कर्म की जे आतल्या आत बांधले जात आहे, त्याची तर लोकांना जाणीवच नाही. त्याचे फळ पुढच्या जन्मी मिळते.

आज एखाद्या माणसाने चोरी केली, ती चोरी स्थूल कर्म आहे. त्याचे फळ या जन्मातच मिळते. पोलिसवाला मारतो. ही सगळी फळे त्याला इथल्याइथेच मिळणार आहेत.

## लक्ष्मीसाठी चार्जिंग

**प्रश्नकर्ता :** सगळेच लक्ष्मीच्या मागे खूप धावतात. म्हणून त्याचा 'चार्ज' (कर्म बंध) जास्त प्रमाणात होत असेल ना? त्यामुळे मग पुढच्या जन्मी त्याला जास्त लक्ष्मी मिळाली पाहिजे ना?

**दादाश्री :** मला लक्ष्मी धर्माच्या मार्गावर खर्च करायची आहे, असे जर त्याने चार्ज केलेले असेल तर त्याला जास्त लक्ष्मी मिळेल.

**प्रश्नकर्ता :** परंतु मनात सतत असे भाव करत राहिला की मला लक्ष्मी मिळो, असे भाव केले, असे 'चार्ज' केले त्यामुळे निसर्ग त्याला लक्ष्मी नाही का देणार?

**दादाश्री :** नाही, नाही, त्यामुळे लक्ष्मी मिळत नाही. लक्ष्मी मिळण्याचे जो भाव करतो ना, त्याला तर लक्ष्मी मिळायची असेल तरी मिळणार नाही, उलट त्यात अंतराय पडतील. लक्ष्मी आठवत राहिल्याने मिळत नाही. ती तर पुण्य केल्यानेच मिळते.

'चार्ज' म्हणजे पुण्याचे चार्ज केले, तर लक्ष्मी मिळते. ती सुद्धा फक्त लक्ष्मी मिळत नाही. पण पुण्य चार्ज करताना जी इच्छा असेल की, मला लक्ष्मीची खूप आवश्यकता आहे, तर त्याला लक्ष्मी मिळेल. कोणी म्हणेल मला तर फक्त धर्मच हवा आहे, तर फक्त धर्मच प्राप्त होईल, आणि पैसे नसतीलही. अर्थात त्या पुण्याचे आपण टेन्डर भरलेले असते की मला असे पाहिजे. मग ते मिळण्यासाठी पुण्य खर्च होते. कोणी म्हणेल 'मला बंगले पाहिजेत, गाड्या पाहिजेत, हे पाहिजे, ते पाहिजे,' तर पुण्य त्यातच खर्च होईल, धर्मासाठी काहीच उरणार नाही. आणि कोणी म्हणेल 'मला धर्मच पाहिजे, मोटारी नको, फक्त दोन लहान खोल्या असतील तरीही चालेल, पण धर्मच अधिक हवा.' तेव्हा त्याला धर्म अधिक मिळतो. आणि दुसरे सगळे कमी मिळते. म्हणजे तो स्वत:च्या इच्छेनुसार पुण्याचे टेन्डर भरतो.

## अशी दानत? तिथे दान व्यर्थ

तर हे वीतराग विज्ञान तुम्हाला पूर्ण मुक्त करेल असे सुंदर आहे. विचार केल्यावर असे वाटत नाही का? किती सुंदर आहे! जर समजून घेतले, 'ज्ञानी पुरुषांकडून' समजून घेतले आणि स्वत:ची बुद्धी सम्यक्

करून घेतली तर काम पूर्ण होईल. व्यवहारातही लोकांनी माझ्याकडून स्वत:ची बुद्धी सम्यक् करून घेतली, जरी ज्ञान घेतले नसेल, तरी माझ्यासोबत थोडावेळ बसले तर बुद्धी सम्यक् होईल. त्यामुळे मग पुढे त्याची प्रगती होत राहते! हे ज्ञान नसेल तर काय दैना होईल? असे जर लोक समजतील तर ते कामाचे.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेतल्याशिवाय तर याचा अंतच येणार नाही.

**दादाश्री :** हो अंत येणार नाही असे आहे. त्याबाबत तर बोलण्यासारखेच नाही. तो पन्नास हजाराचे दान देतो, पण तरी तो तुम्हाला काय सांगतो, 'या शेठचा आग्रह आहे म्हणून देत आहे, नाही तर दिलेच नसते.' म्हणजे हे फक्त त्यालाच माहीत आहे इतकेच नाही, तर तो तुम्हालाही सांगतो. नंतर दुसऱ्यांनाही सांगतो की मी तर असा हुशार आहे. हे असे सर्व बघता ना बाहेर? व्यर्थ, धुळीस मिळाले. म्हणून ह्या सत्संगामध्ये पडून राहतील त्यांचे कामच झाले! संपूर्ण जगाची भानगडच मीटली ना?

## दान सुद्धा गुप्त रूपाने

**प्रश्नकर्ता :** आत्मार्थीकरिता तर कीर्ती अवस्तू आहे ना?

**दादाश्री :** कीर्ती तर फार नुकसानदायक वस्तू आहे. आत्म्याच्या मार्गावर त्याची कीर्ती फार पसरते, पण त्या कीर्तीत त्याला इन्टरेस्ट नसतो. कीर्ती तर पसरेलच ना! चकाकणारा हिरा असेल त्याला बघून प्रत्येक जण म्हणेलच ना की, 'किती चांगला प्रकाश येत आहे, किरणे कशी छान निघत आहेत!' लोक म्हणतात नक्कीच पण त्याला स्वत:ला त्यात खुशी वाटत नाही. याउलट ही जी सांसारिक गोष्टींची कीर्ती आहे, त्या कीर्तीचेच लोक भिकारी आहेत. कीर्तीची भीक आहे म्हणून तर हायस्कूलमध्ये लाख रुपये देतात इस्पितळात देतात, पण त्याला कीर्ती मिळाली म्हणजे फार झाले!

तरी ते देखील व्यवहारात तर असेच म्हणतात की दान गुप्त ठेवा. पण असे गुप्त रूपाने तर क्वाचितच कोणी देतो. बाकी सगळ्यांनाच कीर्तीची भूक आहे म्हणून देतात. लोकसुद्धा कौतुक करतात की वाह! या शेठचे काय सांगावे, अहोहो, लाख रुपयांचे दान दिले! त्याचा मोबदला त्याला इथल्याइथेच मिळाला.

म्हणजे दिल्यानंतर त्याचा मोबदला इथल्याइथेच मिळवला. अणि ज्याने गुप्त ठेवले त्याने मोबदला घेण्याचे पुढच्या जन्मावर सोडले. मोबदला मिळाल्याशिवाय तर राहतच नाही. तुम्ही घ्या किंवा घेऊ नका पण त्याचा मोबदला (ठरलेला) असतोच.

आपापल्या इच्छेनुसार दान द्यायचे असते. हे सगळे तर ठीक आहे, व्यवहार आहे. कोणी आग्रह करेल की तुम्हाला द्यावेच लागतील. मग ते हारतुरे घालून त्यांचा सत्कार करतात, म्हणून ते देतात.

दान गुप्त असावे. जसे हे मारवाडी लोक देवाजवळ चुपचाप दान पेटीत टाकतात ना! दान दिल्याचे कोणालाही कळले नाही, तर ते उगवते.

## तो व्यवहार चांगला म्हटला जातो

**प्रश्नकर्ता :** हीराबांच्या बाबतीत आपण त्यांच्या मागे (दादाजींच्या पत्नीच्या मृत्यूनंतर) जो खर्च केला, तो व्यवहारात कसा समजला जातो?

**दादाश्री :** या संसार व्यवहारात तो चांगला मानला जातो.

**प्रश्नकर्ता :** आपण संसार व्यवहारातच राहायचे.

**दादाश्री :** संसार व्यवहारात हे बरोबर, पण दिसायला पण हे चांगले दिसते. पण ते चांगले दिसावे म्हणून मी केले नाही. ही तर हीराबांची इच्छा होती म्हणून मी केले, मला चांगले-वाईट याची पर्वा नसते, पण तरीही (व्यवहारात) चुकीचे दिसू नये असे मी वागतो.

**प्रश्नकर्ता :** ही तर तुमची गोष्ट झाली पण आमच्यासाठी काय?

**दादाश्री :** तुम्हाला थोडे फार करावे लागते, जास्त खेचण्याची गरज नाही, साधारण व्यवहार करावा लागेल.

## वाह-वाहमध्ये पुण्य खर्च होते

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता तसा जर नियम असेल, तर मग तुम्ही जे हीराबांमागे (दादाश्रींच्या पत्नी) जे खर्च केला त्याचे तुम्हाला पुण्य मिळेल ?

**दादाश्री :** मला काय मिळेल ? मला काही देणेघेणेच नाही ना ! यात पुण्य बांधले जात नाही, यात तर पुण्य खर्च होते. वाह-वाह केली जाते.

किंवा जर कोणी खराब केले तर 'बघा ना, मेल्याने सारे काम बिघडवले' असे म्हणतील. म्हणजे इथल्याइथेच हिशोब पूर्ण होऊन जातो. हायस्कूल बनवले, तेव्हा इथल्याइथेच वाह-वाह झाली. तिथे मिळत नाही.

**प्रश्नकर्ता :** शाळा तर मुलांसाठी बनवली. ती मुले शिकली सवरली, सद्विचार उत्पन्न झाले.

**दादाश्री :** ती गोष्ट वेगळी आहे. पण तुमची वाह-वाह झाली म्हणजे संपले, पुण्य खर्च झाले.

## कोणाच्या निमित्ताने कोणाला मिळते ?

**प्रश्नकर्ता :** वाह-वाह तर ज्याच्यासाठी खर्च केले, त्यालाच मिळेल ना, तुम्हाला नाही. तुम्ही ज्याच्यासाठी जे कार्य करता, त्याचे फळ त्याला मिळते. ज्याच्यासाठी आपण जे पुण्य करतो ते त्यालाच मिळते, आपल्याला मिळत नाही.

**दादाश्री :** आपण करायचे आणि त्याला मिळणार ? असे कधी ऐकले आहे का ?

**प्रश्नकर्ता :** पण त्याच्या निमित्ताने आपण करतो ना?

**दादाश्री :** करा ना त्याच्या निमित्ताने! मग तर त्याच्या निमित्ताने आपण खाल्ले तर काय हरकत? नाही, नाही, तसे काही नाही. ते तर फसवून लोकांना चुकीच्या मार्गावर चढवतात, म्हणे त्याच्या निमित्ताने! त्याला खायचे नसेल आणि आपण खाल्ले तर काय वाईट आहे? नियमबद्ध आहे हे संपूर्ण जग!

## तिथे उमलतात आत्मशक्ती

ते सोबत येणार आहे. हे काही सोबत येत नाही. येथे लगेचच त्याची किंमत मिळते, वाह-वाह लगेचच मिळते. आणि आत्म्याकरिता जे ठेवले असेल ते सोबत येते.

**प्रश्नकर्ता :** सोबत काय येते, म्हणालात?

**दादाश्री :** सोबत तर आपण जे आत्म्यासाठी देतो, ज्याने आत्म्याची शक्ती खूप उमलते, ते आपल्या सोबत येते.

**प्रश्नकर्ता :** आणि इथे जो खर्च केला, त्याचे फळस्वरूप लोक वाह-वाह करतात तेच मिळते ना?

**दादाश्री :** हो, मिळाली, वाह-वाह मिळाली.

## वाह-वाहचे भोजन

**प्रश्नकर्ता :** मी जे दान करतो त्यात माझा भाव धर्मासाठी, चांगल्या कामासाठी असतो. पण त्यासाठी लोकांनी वाह-वाह केली तर ते सारे वाया नाही का जाणार!

**दादाश्री :** यात मोठी रक्कम खर्च झाली, ती जाहीर होते आणि त्याची वाह-वाह केली जाते. आणि अशी रक्कमही दान दिली जाते जी कोणाला कळतही नाही आणि त्याची कोणी वाह-वाह पण करत नाही

म्हणून त्याचा लाभ होतो. आपल्याला त्या भानगडीत पडायचे नाही. आपल्या मनात असा भाव नाही की लोकांनी आपल्याला मान द्यावे! हा इतकाच भाव असला पाहिजे! जग तर महावीरांची पण वाह-वाह करत होते. पण ती ते स्वीकारत नव्हते ना! या दादांची पण लोक वाह-वाह करत होते! पण ती ते 'स्वतः' स्वीकार करत नाही ना! आणि हे उपाशी लोक तर लगेच स्वीकारतात. दानाचा पत्ता लागल्याशिवाय राहतच नाही ना! लोक तर वाह-वाह केल्याशिवाय राहणारच नाहीत, परंतु स्वतः त्याचा स्वीकार केला नाही, तर मग काय हरकत? स्वीकार केला तर रोग शिरेल ना? जो वाह-वाह स्वीकारत नाही त्याला काहीही होत नाही. स्वतः वाह-वाह स्वीकारत नाही म्हणून त्याला काहीच नुकसान होत नाही, आणि प्रशंसा करणाऱ्याला पुण्य मिळते. सत्कार्याच्या अनुमोदनेचे पुण्य बांधले जाते. तर हे सर्व असे आहे. हे सगळे निसर्गाचे नियम आहेत.

जो प्रशंसा करतो त्याच्यासाठी ती कल्याणकारी असते. मग जो ते ऐकतो त्याच्या मनात चांगल्या भावाची बीजे पडतात, की 'हे पण करण्यायोग्य आहे, आम्हाला तर हे माहीतच नव्हते!'

**प्रश्नकर्ता :** आम्ही चांगले कार्य तन, मन आणि धन यानी करत असतो, पण तरी कोणी आमच्याविषयी वाईटच बोलेल, अपमान करील त्याचे काय करावे?

**दादाश्री :** जो अपमान करत आहे, तो भयंकर पाप बांधत आहे. आता यात आपले कर्म धुतले जाते आणि अपमान करणारा तर त्यात निमित्त बनला.

## वाह-वाहची गोडी

अरे, मी तर माझा स्वभाव ओळखून घेत असे! मी अगास आश्रमाला जात असे. त्यावेळी मी कॉन्ट्रॅक्टरचा व्यवसाय करत होतो. तेव्हा काय मला शंभर रुपयांची कमतरता नव्हती. पण त्यावेळी पैशांना

फार किंमत होती. पैशांची तेव्हा कमतरता नव्हती, तरी पण मी जेव्हा अगासला जायचो तेव्हा तिथे (धर्मदानासाठी) रुपये देत असे. शंभर रुपयांची नोट काढून म्हणत असे की, 'पंचवीस घ्या आणि पंच्याहत्तर परत करा.' आता पंच्याहत्तर परत घेतले नसते तरी चालले असते. पण मन कंजूष आणि भिकारी होते, म्हणून पंच्याहत्तर परत घेत होतो.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, तेव्हा पण तुम्ही किती सूक्ष्मपणे बघत होतात?

**दादाश्री :** हो, पण मी काय सांगू इच्छितो की हा स्वभाव, प्रकृती स्वभाव जात नाही ना! तेव्हा मग मी शोध घेतला. तसे तर लोक मला म्हणत की, 'आपण फार नोबल (उदार) आहात.' मी (मनात) म्हणालो, 'असले कसले नोबल?' इथे तर कंजूषी करतो. नंतर शोध घेतल्यावर मला कळले की जिथे माझी वाह-वाह करत तिथे मी लाख रुपये खर्च करून टाकत असे, नाही तर एक रुपयाही देत नसे. हा स्वभाव अगदीच कंजूष नव्हता, पण जिथे वाह-वाह होत नसे तिथे मग धर्म असो किंवा काहीही असो, तिथे देऊ शकत नसे आणि वाह-वाह केली की सगळी कमाई लुटवून देत असे, कर्ज करून सुद्धा! आता ही वाह-वाह किती दिवस? तीन दिवस. नंतर काहीच नाही. तीन दिवसापर्यंत वाह-वाह करतात, नंतर बंद होऊन जाते.

बघा ना, मला आठवते, शंभर द्यायचे तिथे पंच्याहत्तर परत घेत होतो. मला आजही ते दिसते, अजूनही ते ऑफिस दिसते. पण मी समजलो, 'असा ढंग!' लोकांचे किती मोठे मन असते. मी आपला ढंग समजून गेलो होतो. ढंग सर्व. तसे मनही मोठे होते. पण वाह-वाह, गुदगुल्या करणारा पाहिजे. गुदगुल्या केल्या की मग चालू.

**प्रश्नकर्ता :** हा जीवाचा स्वभाव आहे?

**दादाश्री :** हो, ती प्रकृती, सगळी प्रकृती आहे.

आणि हे पक्के, हे वाणी बसले आहेत ना, ते पक्के. ते वाह-वाहीने

फसवले जात नाहीत. ते बरोबर विचार करतात की पुढे जमा होत आहे की मग इथल्याइथेच राहते? आणि वाह-वाह झाली ते तर इथेच वापरून टाकले, त्याचे फळ तर मी इथेच घेऊन टाकले, चव पण घेतली मी. आणि हे वाणी लोक तर वाह-वाह शोधत नाहीत, 'तिथले' फळ शोधतात, ओवरड्राफ्ट, फारच विचारशील आणि पक्के लोक ना! आमच्यापेक्षा जास्त विचारशील. आम्ही क्षत्रिय तर एक धाव आणि दोन तुकडे करणारे. सर्व तीर्थंकर क्षत्रियच होते. साधू स्वतःच सांगतात की आम्ही तीर्थंकर होऊ शकत नाही. कारण आम्ही किती तरी त्याग करून साधू झालो पण तरी एखादी गिनी(सोन्याचे नाणे) आमच्याजवळ राहू देतो, कधी अडचण आली तर? ही त्यांची मूळ ग्रंथी आणि तुम्ही तर लगेच देऊन टाकता. प्रॉमिस टू पे म्हणजे सगळे प्रॉमिसच! दुसरे काही येतच नाही ना! दुसरी समजच नाही. 'थिंकर' (विचारक)च नाही. पण त्यांची सुटका लवकर होते.

**प्रश्नकर्ता :** त्यांची सुटका लवकर होते?

**दादाश्री :** हो, ते लोक मोक्षाला जातात. केवलज्ञान प्राप्त होते. परंतु तीर्थंकर मात्र हे क्षत्रियच असतात. हे लोक सगळेच कबूल करतात माझ्यासमोर, आम्ही क्षत्रिय म्हणवतो. आम्हाला असे काही येत नाही. फार गहन आहे ते. आणि ही तर विचारशील प्रजा. सगळेच समजून-उमजून, प्रत्येक गोष्टीचा विचार करून काम करतात. आणि आम्हाला (क्षत्रियांना) जो पश्चाताप होतो त्याची तर सीमा नाही. आणि त्यांना पश्चाताप कमी होतो.

## ...पण पाटीमुळे नष्ट झाले

कोणी धर्मासाठी लाख रुपये देतो आणि स्वतःच्या नावाची पाटी लावायला सांगतो आणि कोणी एकच रुपया धर्मासाठी देतो, पण गुप्तपणे देतो, तर हे गुप्तपणे दिले त्याची फार किंमत आहे, मग जरी त्याने एकच रुपया दिलेला असो. आणि जर नावाची पाटी लावून घेतली तर ती 'बेलेन्स शीट' हिशोब पूर्ण झाला. तुम्ही मला शंभराची नोट दिली

आणि मी तुम्हाला त्याचे सुटे दिले. त्यात मग मला काही घेणे राहिले नाही आणि तुम्हाला काही देणे राहिले नाही! तुम्ही धर्मासाठी दान देऊन स्वतःच्या नावाची पाटी लावून घेतली म्हणून नंतर काही देणघेणे राहिले नाही ना! कारण धर्मासाठी जे दान दिले त्याचा मोबदला त्याने पाटी लावून मिळवला. आणि ज्याने एकच रुपया प्राइवेटमध्ये दिला असेल, त्याचे काही देणे-घेणे झाले नाही, म्हणून त्याचे बॅलेन्स बाकी राहिले.

आम्ही मंदिरात वगैरे सगळ्या ठिकाणी फिरलो आहोत. तिथे काही ठिकाणी सगळ्या भिंती पाट्या आणि पाट्यानीच भरलेल्या होत्या. त्या पाट्यांची व्हॅल्युएशन (किंमत) किती! फक्त कीर्तीसाठीच! आणि जिथे कीर्तीच्या हेतूने ढिगभर पाट्या असतील, तिथे मनुष्य बघतही नाही, की यात काय वाचायचे? संपूर्ण मंदीरात एकच पाटी असेल तर ती वाचण्यासाठी वेळ काढेल पण हे तर भरपूर, सगळ्याच्या-सगळ्या भिंती पाट्यानीच भरलेल्या असतील तर मग काय होईल? तरी लोक म्हणतात की माझी पाटी लावा! लोकांना पाट्याच आवडतात ना!

## लक्ष्मी दिली आणि पाटी घेतली

**प्रश्नकर्ता :** कित्येक लोक समजल्याशिवायच दान देतात, तर त्याला काही अर्थच नाही?

**दादाश्री :** नाही, समजल्याशिवाय देत नाहीत. ते तर फार पक्के असतात, ते स्वतःच्या हिताचेच करतात.

**प्रश्नकर्ता :** धर्माला न समजता, नावासाठीच देतात. पाटी लावण्यासाठीच देतात.

**दादाश्री :** हे नाव तर, हल्लीच या नावाचे चालले आहे! पूर्वी नावाचे नव्हते. हल्लीच नाव विकायला लागले, ते या कलियुगामुळे. पूर्वी नाव-बिव नव्हतेच. ते सतत देतच असत. म्हणून देव त्यांना काय म्हणत? श्रेष्ठी म्हणत, आणि आता ते शेठ म्हटले जातात.

## शुभ भाव करत राहा

**प्रश्नकर्ता :** एकीकडे मनात असा भाव होतो की मला दानात सर्व काही देऊन टाकायचे आहे, पण तेही रूपकात येत नाही.

**दादाश्री :** पण तसे दिले जात नाही ना! देणे हे काय सोपे आहे? दान करणे ही तर कठीण गोष्ट आहे! तरी पण भाव केला पाहिजे. धन चांगल्या मार्गाने देणे ही गोष्ट आपल्या सत्तेत नाही. आपण भावना करू शकतो, पण देऊ शकत नाही आणि त्या केलेल्या भावनेचे फळ पुढच्या जन्मी मिळते. दान तर हे भोवरे (मनुष्य) कसे देऊ शकतील? अणि जे देतात ते 'व्यवस्थित शक्ती' त्यांना देण्यास भाग पाडते, म्हणून देतात. 'व्यवस्थित शक्ती' करविते, म्हणून मनुष्य दान देतो. आणि 'व्यवस्थित शक्ती' करवित नाही, म्हणून मनुष्य दान देत नाही. 'वीतरागाला' दान देण्याचा किंवा घेण्याचा मोह नसतो. ते शुद्ध उपयोगी असतात.

दान देतांना 'मी दान देतो' असा भाव होतो. त्यावेळी पुण्याचे परमाणू खेचले जातात आणि वाईट काम करतो तेव्हा पापाचे परमाणू खेचले जातात. ते मग फळ देताना शाता फळ देतात, किंवा अशाता फळ देतात. जोपर्यंत अज्ञानी असतात तोपर्यंत फळ भोगतात, सुख-दुःख भोगतात. याउलट ज्ञानी ते भोगत नाहीत, फक्त जाणतात.

## लक्ष्मीचा सदुपयोग कशात?

**प्रश्नकर्ता :** पण समजा, एखाद्या मनुष्याच्या पुण्य कर्माने त्याच्याकडे लाखो रुपये जमले, तर ते त्याने गरीबांना वाटावे की स्वतःच त्याचा उपयोग करावा?

**दादाश्री :** नाही, घरच्या लोकांना दुःख होणार नाही अशा प्रकारे ते पैसे खर्च केले पाहिजेत. घरच्या लोकांना विचारावे की, बाबानो, तुम्हाला अडचण तर नाही ना? तेव्हा ते म्हणतील, नाही, काहीच

अडचण नाही. तर ती लिमिट त्याची, पैसे खर्च करण्याची लिमिट. मग आपण त्यानुसार खर्च करावे.

**प्रश्नकर्ता :** सन्मार्गावर तर खर्च करायचा ना?

**दादाश्री :** हो, बाकीचे सगळे सन्मार्गावरच खर्च केले पाहिजे. घरात खर्च होतील ते सारे गटारीतच जातील. आणि इतर ठिकाणी खर्च झाले ती तुमच्यासाठीच सेफसाइड झाली. हो, इथून सोबत काही घेऊन जाऊ शकत नाही, पण असे दुसऱ्या प्रकारे सेफसाइड करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** पण तसे पाहिले तर हे सोबत घेऊन गेल्यासारखेच म्हटले जाईल ना!

**दादाश्री :** हो, सोबत घेऊन जाण्यासारखेच झाले, आपल्या सेफसाइडवाले. म्हणजे कोणत्याही प्रकारे दुसऱ्यांना सुख मिळेल, त्यासाठीच खर्च केले पाहिजेत. ती सगळी तुमची सेफसाइड आहे.

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मीचा सदुपयोग कशाला म्हणतात?

**दादाश्री :** लोकांच्या उपयोगासाठी किंवा मग देवासाठी खर्च केले त्यास सदुपयोग म्हटला जातो.

## आमची पण भावना सदैव राहिली

माझ्याकडे लक्ष्मी असती तर मी लक्ष्मी दिली असती, पण अशी काही लक्ष्मी माझ्याजवळ आली नाही आणि आली तर आता सुद्धा द्यायला तयार आहे. मला काय सोबत घेऊन जायचे आहे हे सर्व? पण काही तरी द्या सगळ्यांना! तरी पण सगळ्यांना लक्ष्मी देण्याऐवजी कशा प्रकारे या जगात सगळे सुखी होवोत, जीवन कसे जगावे, असा मार्ग दाखवा त्यांना. एखाद्याला दहा हजार दिले तर दुसऱ्याच दिवशी तो नोकरी बंद करेल, म्हणून लक्ष्मी देऊ नये. अशा प्रकारे लक्ष्मी देणे गुन्हा आहे. मनुष्याला आळशी बनवून टाकते. म्हणून बापानेही मुलाला जास्त

लक्ष्मी देऊ नये, नाही तर मुलगा दारुड्या होईल. मनुष्याला चैन मिळाली की बस, मग तो चुकीच्या मार्गाला लागतो.

## मुलांना द्यावे की दान करावे?

**प्रश्नकर्ता :** पुण्याच्या उदयामुळे जर आवश्यकतेपेक्षा जास्त लक्ष्मी प्राप्ती झाली तर?

**दादाश्री :** तर खर्च करून टाकावी. मुलांसाठी जास्त ठेवू नये. त्यांना शिकवावे, सवरावे. सगळे कम्प्लीट करून, त्यांना नोकरीला लावले की मग ते कमवायला लागतील. म्हणून जास्त ठेवू नये. थोडेसे बँकेत, किंवा कुठे तरी ठेवायचे, दहा-वीस हजार, मग कधीतरी तो अडचणीत असला तर त्याला द्यावे पण त्याला सांगू नये, की बाबा मी ठेवले आहे. हो, नाही तर अडचण नसली तरी उभी करेल.

एका व्यक्तीने मला प्रश्न केला की, मुलांना काही देऊ नये का? मी म्हणालो, 'मुलांना द्यायचे, आपल्या बापाने आपल्याला जे दिले ते सर्व द्यायचे आणि मधला जो माल आहे, तो आपला. तो मग आपण आपल्या मर्जीनुसार धर्मासाठी वापरावा.

**प्रश्नकर्ता :** आम्हा वकिलांच्या कायद्यात सुद्धा असेच आहे की जी वडिलोपार्जित संपत्ति आहे ती मुलांना दिली पाहिजे. आणि जी स्वउपार्जित संपत्ति आहे, त्याचे बापाला जे करायचे असेल ते त्याने करावे.

**दादाश्री :** हो, जे करायचे असेल ते करावे. आपल्या हातूनच झाले पाहिजे! आपला मार्ग काय म्हणतो की जो तुझा स्वत:चा माल आहे, त्याला तू वेगळा करून (धर्मासाठी) खर्च कर, तर तो तुझ्यासोबत येईल. कारण बाहेरगावी जातो तेव्हा थोडी शिदोरी सोबत घेऊन जातो, मग हे सगळे नको का?

**प्रश्नकर्ता :** जास्त तर केव्हा म्हणावे? ट्रस्टी प्रमाणे राहिले तर.

**दादाश्री :** ट्रस्टी प्रमाणे राहणे उत्तम आहे. पण असे राहता येत नाही, सगळेच असे राहू शकत नाहीत. ते सुद्धा पूर्णपणे ट्रस्टी प्रमाणे राहू शकत नाहीत. ट्रस्टी म्हणजे तर ज्ञाता-दृष्टा झाला. पण ट्रस्टी प्रमाणे पूर्णपणे राहिले जात नाही. पण असा भाव असेल तर थोडे फार राहू शकतो.

आणि मुलांना किती द्यायचे असते? तर आपल्या वडिलांनी आपल्याला जेवढे दिले असेल तेवढे, आणि काही दिले नसेल तरी आपण काही ना काही दिले पाहिजे.

मुले दारुडे बनतात ना, फार वैभव असेल तर?

**प्रश्नकर्ता :** हो बनतात. मुले दारुडे बनणार नाहीत तेवढे तरी दिले पाहिजे?

**दादाश्री :** तेवढेच दिले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** जास्त वैभव दिले तर तसे होऊ शकते.

**दादाश्री :** हो, त्यामुळे त्याचा मोक्ष बिघडेल. नेहमी पद्धतशीर असलेलेच चांगले. मुलांना जास्त देणे हा गुन्हा आहे. फॉरेनवाल्यांना हे समजते! किती समंजस आहेत!! आणि यांना तर सात पिढ्यांपर्यंतचा लोभ! सातव्या पिढीच्या माझ्या मुलाकडे असे असावे. किती लोभी आहेत हे लोक? मुलांना आपण काम धंद्याला लावायचे, तितके आपले कर्तव्य. आणि मुलींचे आपण लग्न करून दिले पाहिजे. मुलींना काही तरी दिले पाहिजे. आजकाल मुलींचा वाटा द्यायला लावतात ना वाटेकऱ्याप्रमाणे? लग्नात खर्च होतो ना? आणि वरून थोडे फार द्या. तिला दागिने वगैरे द्यावे, ते देतातच ना! पण स्वत:चा पैसा मात्र स्वत:च खर्च केला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** मुलांना पारिवारिक व्यवसाय सोपवला पाहिजे आणि कर्ज पण दिले पाहिजे ना?

**दादाश्री :** आपल्याकडे एक मिलियन डॉलर असोत किंवा अर्धा मिलयन डॉलर असोत, तरीही मुलगा ज्या घरात राहतो, ते घर मुलाला द्यावे. मग त्याला एखादा काम-धंदा सुरू करून द्यावा, त्याला आवडत असेल तो. कोणते काम त्याला आवडते ते विचारून मग जे काम त्याला ठीक वाटेल, ते सुरू करवून द्यावे. आणि पंचवीस-तीस हजार बँकेतून मिळवून द्यावे, लोनवर. मग तो स्वतःच लोन भरत राहील. आणि थोडे फार आपण द्यायचे. त्याला हवी असेल त्यातली अर्धी रक्कम आपण द्यावी आणि अर्धी बँकेतून, मग तो लोन फेडत राहील. म्हणजे कोणी धक्का मारणारा हवा त्याला. ज्यामुळे तो दारू पिणार नाही. मग मुलगा म्हणेल की, 'या वर्षी मला लोन फेडता येणार नाही.' तेव्हा म्हणावे की, मी तुला कोणाकडून पाच हजार आणून देतो, पण मग लवकरच परत करायचे. असे सांगून पाच हजार आणून द्यावे. नंतर आपण त्या पाच हजाराची आठवण करून द्यावी की, 'लवकर परत करा, असे ते म्हणाले आहेत.' अशी आठवण करून दिली तर मुलगा म्हणेल, 'तुम्ही कटकट करू नका आता.' तेव्हा आपण समजून जावे. 'खूप चांगले झाले हे.' म्हणजे मग तो पुन्हा पैसे मागायला येणारच नाही ना! 'कटकट करता' असे म्हणाला, त्याची आपल्याला हरकत नाही, पण तो मग पुन्हा मागायला तर येणार नाही ना!

म्हणजे आपण आपली सेफसाइड ठेवावी शिवाय मुला समोर आपले वाईटही दिसत नाही. मुलगा म्हणेल, 'वडील तर चांगले आहेत!' पण माझा स्वभाव जरा वाकडा आहे. मी उलट बोललो म्हणून. बाकी वडील तर फार चांगले आहेत. तात्पर्य हेच की पळ काढावा या जगातून.

## आदर्श विल

मुलीला काही प्रमाणात द्यावे. मुलाला द्यावे, पण ठराविक प्रमाणात. आणि अर्धी पुंजी तर स्वतःजवळच ठेवावी. म्हणजे प्राईवेट! जाहीर केली नसेल तशी!! दुसरे सगळे जाहीर करावे व म्हणावे की आम्हा दोघांना मरेपर्यंत काही तरी हवे ना?

म्हणजे आपल्याला पद्धतशीर, समंजसपणे काम करायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** पण मनुष्य मृत्यू पावतो, त्या नंतरचे विल कसे असावे ?

**दादाश्री :** नाही, आपल्याजवळ जितके असतील समजा अडीच लाख रुपये उरलेत, ते तर मृत्यू आधिच, आपल्या उपस्थितीतच, खर्च करून टाकावे. मृत्यूपर्यंत राहू द्यायचेच नाहीत, शक्य असेल तर ओवरड्राफ्ट काढून घ्यावा. हॉस्पिटलचे, ज्ञानदानाचे, असे सगळे ओवरड्राफ्ट काढून घ्यावे, आणि नंतर जे उरेल ते मुलांना द्यावे. आणि थोडे वाचवावेसुद्धा. त्यांना थोडा लोभ आहे ना, त्या लोभासाठी पन्नास हजार ठेवावे. आणि बाकीच्या दोन लाखांचा ओवरड्राफ्ट काढून घ्यावा, पुढच्या जन्मी आम्ही काय करणार? हे सगळे मागच्या जन्माचे ओवरड्राफ्ट आता खर्च करत आहात, मग या जन्मात ओवरड्राफ्ट काढायला नको का? हो, आपण कोणाला देऊन टाकले नाही. हे तर लोकांच्या हितासाठी, लोककल्याणासाठी खर्च केले, त्याला ओवरड्राफ्ट म्हणतात. मुलांना देऊन तर अनेक जण पस्तावले आहेत, खरोखरच पस्तावले आहेत! मुलांचे हित कसे करावे, हे आपल्याला समजले पाहिजे. यासाठी माझ्याशी चर्चा करून नीट समजून घ्यावे.

म्हणून मी म्हणतो की पैसे धुळीत जाण्याऐवजी एखाद्या चांगल्या मार्गी जावे असे काही तरी करा. पुढच्या जन्मी तुम्हाला उपयोगी पडतील. नाही तर इथून जाताना (तीरडी वर) चार नारळ बांधतील. ते सुद्धा मुलगा काय म्हणेल, 'जरा स्वस्तातले बिन पाण्याचे द्या की!' तुमच्या जवळ जास्त पैसे असतील तर ते चांगल्या मार्गी वापरावे, लोकांच्या सुखासाठी खर्च करावे. तेवढेच तुमचे, बाकी सर्व गटारीत...!

हे असे सर्व बोलायचे तर नसते, पण तरी आम्ही बोलतो!

## आणि हिशोब असे फेडले जातात

**प्रश्नकर्ता :** एका माणसाला आम्ही पाचशे रुपये दिले आणि ते रुपये तो परत करू शकला नाही. आणि दुसरे, की आपण पाचशे रुपयांचे दान दिले. तर या दोन्ही गोष्टीत काय फरक आहे?

**दादाश्री :** दान दिले ती वेगळी गोष्ट आहे. त्यात जो दान घेतो तो कर्जदार बनत नसतो. तुमच्या दानाचा मोबदला तुम्हाला दुसऱ्या प्रकारे मिळतो. दान घेणारा मनुष्य तुम्हाला मोबदला देत नाही. याउलट तुम्ही ज्याच्याकडे पैसे मागता, त्याच्याद्वारेच तुम्हाला पैसे देण्यास भाग पाडता. मग शेवटी हुंड्याच्या रूपातही तो ते रुपये देईल. आपल्यात असे म्हणतात ना की मुलगा गरीब आहे पण घर-परिवार खानदानी आहे, म्हणून पन्नास हजार त्याला हुंड्यात द्या! हा कुठला हुंडा आहे? तर घेणे आहे तेच ते परत करतात. हा सगळा हिशोब आहे. एक तर मुलगी देतात आणि वर रुपये पण देतात. म्हणजे अशा तऱ्हेने हिशोब फेडला जातो.

## विश्वसनीय सांगणारा

कोणी पाच हजार रुपये तुमच्या हातातून हिसकावून घेतले तर तुम्ही काय कराल?

**प्रश्नकर्ता :** असे तर किती तरी हिसकावले गेले आहे. सगळी मिळकत पण गेली आहे.

**दादाश्री :** मग काय करता? मनात काही होत नाही?

**प्रश्नकर्ता :** काही नाही.

**दादाश्री :** तेवढे बरे आहे, मग तर तुम्ही समंजस आहात. हिसकावण्यासाठीच तर येतात. इथे नाही गेले तर तिथे जातील. म्हणून चांगल्या जागी देऊन टाकावे. कुठे ना कुठे तर जाणारच आहे. धनाचा स्वभावच तसा आहे, चांगल्या मार्गाने नाही गेले तर वाईट मार्गाने जाईल. चांगल्या मार्गाने कमी गेले आहेत आणि वाईट मार्गाने जास्त गेले आहेत.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला चांगला मार्ग दाखवा. कसे कळावे की मार्ग चांगला आहे की वाईट?

**दादाश्री :** चांगला मार्ग तर तसा... आम्ही एक सुद्धा पैसा घेत नाही. मी स्वतःच्या घरचे कपडे घालतो. या देहाचा मी मालक नाही!

सव्वीस वर्षांपासून मी या देहाचा मालक नाही. या वाणीचा मी मालक नाही. आता तुम्हाला अशी खात्री पटली आहे माझ्यावर थोडा विश्वास बसला आहे, म्हणून मी तुम्हाला सांगतो की तुम्ही अमक्या ठिकाणी पैसे दिले तर ते चांगल्या मार्गाने खर्च होतील. तुमचा माझ्यावर विश्वास बसला म्हणून मी तुम्हाला सांगितले, तर त्याला काही हरकत आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तोच चांगला मार्ग आहे. आणखी कुठला? सांगणारा विश्वसनीय असावा! त्याचे त्यात अजिबात कमिशन नसावे. एक पैसा पण त्यात कमिशन नसावे, तरच त्याला विश्वसनीय म्हणायचे. आम्हाला असे दाखवणारे भेटले नाहीत. आम्हाला तर ज्यात त्यात कमिशन... (जाईल असे दाखवणारेच भेटलेत)

**प्रश्नकर्ता :** दादाजी आम्हाला मार्ग दाखवित राहा.

**दादाश्री :** जिथे किंचितमात्र कमिशन आहे, तिथे पैसा चुकीच्या मार्गावर जातो. आतापर्यंत या संघाचे चार आणे देखील खर्च झाले नाहीत, कोणी कारकून किंवा त्याच्या नावावर बिलकूल खर्च झाले नाहीत. सगळेच स्वतःच्या पैशाने काम करून घेतात, असा हा संघ, पवित्र संघ! म्हणजे खरा मार्ग हा आहे. जेव्हा द्यायचे असेल तेव्हा द्या आणि ते सुद्धा तुमच्याजवळ असतील तरच, नसतील तर नका देऊ. आता हा भाऊ म्हणेल, 'मी पुन्हा देऊ का दादाजी?' तर मी म्हणेल, नाही रे बाबा, तू तुझा धंदा करत जा. एकदा तर दिले त्याने! मग पुन्हा देण्याची इथे गरज नाही! तुमच्याजवळ असेल तर शक्तिनुसार द्यावे. दहा रतल वजन उचलू शकत असाल तर आठ रतल उचला, अठरा रतल उचलू नका. दुःखी होण्यासाठी करायचे नाही! पण सरप्लस (जास्तीचे) धन चुकीच्या मार्गाने जाऊ नये, त्याकरिता हा मार्ग दाखवत आहोत. हो, नाही तर लोभ आणि लोभातच चित्त भटकत राहील! म्हणून ज्ञानी पुरुष दाखवतात की अमक्या ठिकाणी वापरा.

## धन द्या सीमंधर स्वामींच्या मंदिरात

अधिक धन असेल तर ते सीमंधर स्वामींच्या मंदिरात देण्यासारखे आहे, त्यासारखे दुसरे एकही स्थान नाही. आणि कमी धन असेल तर महात्म्यांना भोजन करवावे, त्यासारखे उत्तम दुसरे काहीच नाही! आणि त्यापेक्षाही कमी असेल तर एखाद्या दुःखी माणसाला द्यावे. आणि तेसुद्धा नगदी नव्हे, तर त्याला खाणे-पिणे इत्यादी देऊन. कमी पैशातूनसुद्धा दान करायचे असेल तर जमेल की नाही जमणार?

## ओळखा सीमंधर स्वामींना

आपल्या येथे सीमंधर स्वामींचे नाव तर तुम्ही ऐकले आहे ना? ते वर्तमान तीर्थंकर आहेत, महाविदेह क्षेत्रामध्ये! त्यांची उपस्थिती आहे आजही.

सीमंधर स्वामींचे वय किती असेल? साठ सत्तर वर्षांचे असेल? पावणे दोन लाख वर्षाचे वय आहे! आणखी सव्वा लाख वर्ष जगणार आहेत. आम्ही त्यांच्याशी तुमची तार, संबंध जोडून देतो, कारण आपल्याला तिथे जायचे आहे. अजून एक जन्म बाकी राहील. इथून सरळ मोक्ष होणार नाही. आणखी एक जन्म बाकी राहील. त्यांच्याजवळ बसायचे आहे, म्हणून सांधा जुळवून देतो.

आणि हे भगवंत संपूर्ण जगाचे कल्याण करतील. साऱ्या जगाचे कल्याण होईल! साऱ्या जगाचे कल्याण होईल त्यांच्या निमित्ताने. कारण ते जिवंत आहेत. जे गेलेत ते काही करू शकत नाहीत, (त्यांच्या भक्तीने) फक्त पुण्य बांधले जाते.

## अनन्य भक्ती, तिथे दिले जाते

आपल्याला मोक्षाला जायचे आहे. मोक्ष प्राप्ती करू शकू तेवढे पुण्य पाहिजे. इथे तुम्ही सीमंधर स्वामींचे जेवढे कराल त्यात तुमचे सर्व आले. खूप झाले! त्यात असे नाही की हे कमी आहे. तुम्ही जे

(देण्यासाठी) ठरवले असेल, ते सगळे करा. मग त्यात सर्व आले. त्याहून जास्त करण्याची गरज नाही. मग हॉस्पिटल बनवा किंवा आणखी काही बनवा. ते सर्व वेगळ्या मार्गाने जाते.

## हे आहेत जिवंत-जागृत देव

सध्या लक्ष्मीच्या सदुपयोगाचा अगदी खरा मार्ग कोणता आहे? 'बाहेर दान देणे हा? कॉलेजमध्ये पैसे द्यावे हा?' नाही! आपल्या या महात्म्यांना चहा-पाणी, नाश्ता द्या. त्यांना संतोष देणे हा सर्वात उत्तम मार्ग. असे महात्मा जगात कुठेही मिळणार नाहीत. तिथे सत्‌युगच दिसते, आणि ते सर्व आले तर तुमचे भले कसे होवो, हीच त्यांची भावना दिवसभर असते.

पैसे नसतील ना, तर त्यांच्याकडे जेवा, राहा, ते सर्व आपलेच आहे. समोरासमोर आपसातले आहे, ज्यांच्याकडे सरप्लस आहे त्यांनी खर्च करावे. आणि अधिक असेल तर मनुष्यमात्राला सुखी करा, ते चांगले आहे आणि त्याहीपुढे, समस्त जीवांच्या सुखासाठी खर्च करावे.

बाकी शाळेत द्याल, कॉलेजात द्याल, त्याने प्रसिद्धी होईल, पण खरे तर हेच आहे. हे महात्मा एकदम खरे आहेत, याची मी गॅरेंटी देतो, भले कसेही असोत. पैसे कमी असले तरी त्यांची दानत मात्र साफ आहे आणि भावनाही खूप सुंदर आहे. प्रकृती स्वभाव तर वेगवेगळा असतोच. हे महात्मा तर जिवंत-जागृत देव आहेत. त्यांच्या आत आत्मा प्रकट झालेला आहे. एक क्षण सुद्धा आत्म्याला विसरत नाहीत. जिथे आत्मा प्रकट झाला आहे, तिथे देव आहे.

**प्रश्नकर्ता :** लोकांना जेवू-खाऊ घातले तर ते त्याचे फळ मिळत नाही का?

**दादाश्री :** ते हो, मिळते ना! पण इथल्याइथेच वाह-वाह होते, तेवढेच. इथल्याइथेच फळ मिळून जाते. याउलट त्याचे फळ तिथे मिळते. वाह वाह होत नाही त्याचे फळ तिथे मिळते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे सोबत घेऊन जावे, असेच ना?

**दादाश्री :** ते सोबत घेऊन जायचे. हे जे तुम्ही दहा दिले ते तुम्ही सोबत घेऊन जाणार आणि इथे वाह-वाह झाली ते सर्व इथल्या इथेच खर्च झाले.

**प्रश्नकर्ता :** तर उद्यापासून सर्वांना जेवण देणे बंद करावे लागेल.

**दादाश्री :** भोजन देणे ते तर तुमच्यासाठी अनिवार्यच आहे. अनिवार्य म्हटल्यावर केल्याशिवाय गत्यंतरच नाही.

याचे असे आहे की या महात्म्यांना जेवू तर तुम्ही घाला, आणि बाहेरच्या लोकांना जेवू घालणे ती वेगळी गोष्ट आहे. ते वाह-वाहचे कार्य आहे, इथे कोणी वाह-वाह म्हणायला आले नाहीत. हे महात्मा तर, जगात असे कोणीही पुरुष भेटणार नाहीत, किंवा असे कोणी ब्राह्मण भेटणार नाहीत, असे हे महात्मा आहेत. त्यांना तुमचे काहीही घेण्याची इच्छा नाही, चुकीची दृष्टीच नाही या महात्म्यांना. हे महात्मा कसे आहेत? कोणत्याही प्रकारचा फायदा करून घेण्यामागे नाहीत, असे हे महात्मा आहेत. असे महात्मा कुठे भेटतील?! हे जग तर स्वार्थाचे आहे, पण हे महात्मा मात्र करेक्ट (खरे) आहेत. अशी माणसे नसतातच ना! या जगात तर नसतातच!

त्यांना अशी इच्छाच होत नाही की हा डॉक्टर माझ्या कामाचा आहे. त्यांच्या मनात असा विचारसुद्धा येत नाही. आणि इतर लोक तर डॉक्टर आले की लगेच विचार करतात की कधी तरी उपयोगी येतील. अरे मूर्ख, फक्त औषध खाण्याकरिता? स्वस्थ आहेस तरी औषध खाण्यासाठी घडपडतोस?

हे महात्मा कसे आहेत, हे माझे शब्द जर आपल्याला नीट समजले ना, तर ते देवासारखे आहेत, पण या महात्म्यांना ते माहीत नाही. यांना चहा पाणी पाजले, खाऊ घातले, जेवण दिले, हा सर्वात मोठा यज्ञ म्हटला जातो. उच्च कोटीचा यज्ञ. बांगड्या विकून जरी त्यांना जेवण

दिले ना, तरीही खूप चांगले! बांगड्या शांती देत नाहीत. या महात्म्यांसोबत बसावे, त्यांची नीयत वाईट नाही. म्हणून या महात्म्यांना जितके खाऊ घालता येईल तितके घालत जा. चहा जरी पाजलात तरी फार झाले.

## अशी समज द्यावी लागते

एक मनुष्य माझा सल्ला मागत होता की मला पैसे द्यायचे आहे, तर मी कशा प्रकारे देऊ? तेव्हा मी समजलो, याला पैसे देण्याची समज नाही. मी विचारले, तुझ्याजवळ पैसे आहेत? त्यावर तो म्हणाला 'हो'. तेव्हा मी म्हणालो की, 'अशा प्रकारे दे.' मी जाणत होतो की तो माणूस मनाचा खूपच स्वच्छ आहे, आणि भोळाभाबडा आहे. म्हणून त्याला खरी समज द्यावी.

म्हणजे झाले असे की आम्ही एका सदगृहस्थाकडे गेलो होतो. त्याने मला गाडीने सोडण्यासाठी एक माणूस पाठवला. फक्त सोडण्यासाठीच. त्याने त्या डॉक्टरला सांगितले की दादाजींना गाडीने सोडायला तुम्ही जाऊ नका, मी त्यांना सोडून येईन. म्हणजे असे ते सोडायला आले आणि त्यात आमच्या गप्पागोष्टी झाल्या. तो माणूस माझा सल्ला मागत होता, 'मला पैसे द्यायचे आहेत तर ते कुठे द्यावे, कसे द्यावे?' 'बंगला बनवला आहे म्हणजे पैसे तर कमावले असतील.' त्यावर तो म्हणाला, 'बंगला बनवला, सिनेमा थियेटर बनवले. नुकतेच सव्वा लाख रुपयांचे दान मी माझ्या गावात दान दिले.' तेव्हा मी म्हणालो, 'जास्त कमावले असाल, तर एखादी आप्तवाणी छापून द्या.' त्यावर लगेच तो म्हणाला 'तुमच्या बोलण्याचीच वेळ आहे, हे तर मला माहीतच नव्हते. मला कोणी समजावतच नाही.' मग तो म्हणाला, 'या महिन्यातच लगेच छापून देईन.' नंतर त्याने पुढे विचारले की किती खर्च होईल? मी म्हणालो, 'वीस हजार होतील,' तो लगेच म्हणाला की, 'इतकी पुस्तके मी छापून देईन!' मी त्याला घाई न करण्यास सांगितले.

म्हणजे अशी भली माणसे असतात ज्यांना दान कसे देणे हे समजत नसते, आणि ते सुद्धा त्याने विचारले तर आम्ही सांगतो. आम्हाला

माहीत आहे की तो साधा-भोळा आहे. त्याला समजत नाही म्हणून आम्ही त्याला सांगतो. बाकी, समजदारांना तर काही सांगण्याची गरजच नाही ना! नाही तर त्याला दु:ख होईल. आणि दु:ख होईल असे आम्हाला नकोच. इथे पैशांची गरजच नाही. सरप्लस असेल तरच द्या. कारण ज्ञानदानासारखे दुसरे कोणतेही दान नाही या जगात!

कारण या ज्ञानाची पुस्तके जे कोणी वाचेल त्याच्यात केवढे परिवर्तन होईल! म्हणून असेल तर द्यावे, नसेल तर आपल्याकडे तशी काही गरजही नाही!

## सरप्लसचे दान

**प्रश्नकर्ता :** सरप्लस कशाला म्हणतात?

**दादाश्री :** सरप्लस (अतिरिक्त) तर आज तुम्ही द्याल आणि उद्या तुम्हाला चिंता होईल अशी परिस्थिती असेल त्यास सरप्लस म्हणत नाही. पुढच्या सहा महिन्यांपर्यंत मला (पैशांची) काहीच अडचण होणार नाही, असे स्वत:ला वाटले तरच काम करावे, अन्यथा करू नये.

तसे तर तुम्ही हे काम कराल तर तुम्हाला अडचण येणारच नाही. हे काम तर आपल्याआपणच पूर्ण होत असते. हे तर देवाचे काम आहे. हे काम जो कोणी करतो त्याची आपोआपच भरपाई होऊन जाते. पण तरीही मी तुम्हाला सावध केलेच पाहिजे. समजल्याशिवाय, विचार केल्याशिवाय करा असे मी कशाला सांगू? डोळे मिटून यात उडी मारा, असे करायला मी का म्हणून सांगू? मी तर तुमच्या हितासाठी सावध करतो की, 'मागच्या जन्मी तुम्ही दिले होते म्हणून आज तुम्हाला मिळत आहे, आणि आज द्याल तर ते परत मिळेल. हा तर तुमचाच ओवरड्राफ्ट आहे. यात मला काही देणेघेणे नाही. मी तर तुम्हाला चांगल्या जागी देण्यास लावतो, एवढेच.' मागच्या जन्मी जे दिले होते ते ह्या जन्मात घेत आहोत. सगळ्यांनाच काय डोके नाही? नाही, 'डोके वापरून हे दिले नाही, असेच दिले आहे सर्व! तुम्ही बँकेत ओवरड्राफ्ट क्रेडिट

केले असेल तर तुमच्या हातात चेक येईल.' चांगली बुद्धी असेल तर पुन्हा जॉइंट होऊन जाते सर्व.

## घेताना पण किती बारीक समज

इथे फक्त जी पुस्तके छापली जातात तेवढ्यापुरतेच, आणि इतका विश्वास नक्कीच आहे की या पुस्तकांचे पैसे येऊन मिळतील, आपल्या आपणच. त्यासाठी जे निमित्त आहेत. ते सगळे येऊन मिळतात. त्यांना काही सांगावे लागत नाही किंवा भीक मागावी लागत नाही. कोणाकडून मागितले तर त्याला दुःख होईल. तो म्हणेल इतके सारे? 'इतके सारे' म्हटल्या बरोबरच त्याला दुःख होते. अशी आपल्याला खात्री झाली ना? आणि कोणालाही दुःख झाले म्हणजे आमचा धर्म राहिला नाही. म्हणून आपण कधीही मागू नये. तो स्वतःच्या खुशीने म्हणत असेल तर आपण घेऊ शकतो. तो स्वतः ज्ञानदानाचे महत्व समजत असेल तरच आपण घेऊ शकतो. ज्यांनी ज्यांनी दिले आहेत त्यांनी ज्ञानदानाचे महत्व समजूनच दिले आहेत. आपल्याआपणच देतात. आतापर्यंत मागितले नाही.

येथे पुस्तके छापून घेतली असतील तर आपल्या पैशांना शोभा येईल, आणि पुण्य असेल तेव्हाच तर असा योग येतो. पैसे चांगले असतील तरच छापून घेता येईल. नाही तर छापली जाणार नाहीत, तसा योग येतच नाही ना!

## येथे स्पर्धा होत नाही

आणि ते स्पर्धेत बोलण्याची गरज नाही. हे स्पर्धेच्या लाइनीतले नाही की येथे बोली लावली जाईल की हा इतकी रक्कम बोलला, तो तितकी रक्कम बोलला! वीतराग्यांकडे अशी स्पर्धा होत नाही. पण हे तर आता दूषमकाळात घुसले आहे. ही सगळी दूषम काळाची लक्षणे आहेत. स्पर्धा करणे हा तर भयंकर रोग आहे. मनुष्य पैज लावतो. आपल्या इथे असे कोणतेच लक्षण नसते. येथे पैशांची मागणी केली जात नाही.

## दादाजींच्या हृदयांची गोष्ट

इतकी सारे पत्रे येतात की तो सांभाळणे खूप मोठे कठीण काम आहे. म्हणून आता अन्य लोक छापून घेतील तेव्हाच हे काम होईल. आपण तर हे मोफत देतो, पहिल्यांदा, फर्स्ट टाइम. नंतर लोक आपल्याआपणच छापून घेतील. हे तर आपले जे ज्ञान उत्पन्न झाले आहे ते लुप्त होऊ नये, म्हणून छापून घ्यायचे आहे. आणि कोणी ना कोणी तर भेटतातच, स्वत:हूनच हो म्हणतात. आपल्या येथे काहीच अनिवार्य नसते. येथे कुठलाही लॉ (कायदा) नाही. नो लॉ तोच लॉ.

## प्रिय वस्तू सोडा तर समाधी

समाधी केव्हा येईल? संसारात ज्याच्यावर अतिशय प्रेम आहे, त्यास मोकळे सोडता येईल तेव्हा. संसारात कोणावर अतिशय प्रेम आहे? तर लक्ष्मीजी वर. म्हणून तिला मोकळी सोडा. तेव्हा लोक म्हणतात लक्ष्मी मोकळी सोडल्यावर आणखी जास्त येऊ लागली आहे. तेव्हा मी सांगतो, जास्त आली तर जास्त द्यावी. प्रिय वस्तू सोडली तर समाधी वाटते.

## असा आहे मोक्षमार्ग

हे भाऊ पैसे लुटवून देत होते. नंतर मला विचारत होते की हा मोक्षाचा मार्ग आहे का? मी म्हणालो, 'हाच मोक्षमार्ग आहे, मग याहून दुसरा मोक्षाचा मार्ग कसा असतो? स्वत:जवळ असेल ते लुटवून द्यावे मोक्षासाठी. त्याचे नाव मोक्षमार्ग. शेवटी तर सगळे आगीतच सोडायचे आहे ना? शेवटी अग्नि देतोच, त्याशिवाय चालते का कोणाला? तुम्हाला कसे वाटते?

जे स्वत:जवळ आहे ते लुटवून द्यावे आणि ते सुद्धा चांगल्या कामासाठी, मोक्षासाठी किंवा मोक्षार्थीसाठी, जिज्ञासूंसाठी किंवा ज्ञानदानासाठी लुटवावे, तोच मोक्षमार्ग आहे.

❖ ❖ ❖ ❖ ❖

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष !
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2, 3

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830080820 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229


**www.dadabhagwan.org**



## दानाचे मार्ग

दान चार प्रकारचे असते, १) आहारदान २) औषधदान ३) ज्ञानदान ४) अभयदान.

भुकेल्या व्यक्तीला खायला दिले ते अन्नदान. आजारी व्यक्तीला औषधे आणून मोफत दिली ते औषधदान. लोकांना नीट समजावून त्यांना चांगल्या मार्गावर वळवणे आणि लोकांचे कल्याण होईल अशी पुस्तके छापणे म्हणजे ज्ञानदान. आणि कोणत्याही जीवमात्राला किंचितदेखील त्रास न होवो असे वागणे म्हणजे अभयदान.

-दादाश्री

dadabhagwan.org

ISBN 978-93-86321-01-5

9 789386 321015

Printed in India

Price ₹10